# नवी वसाहत

(लघुकथासंग्रह)

प्रो. भा. म. गोरे,

एम्. ए.

विलिंग्डन कॉलेज, सांगली.



१९४६ किंमत दोन रुपये

## अनुक्रम



---



---


मुखपृष्ठ : ग. ना. जाधव

प्रकाशक—
दा. ना. मोघे, बी. ए.
स्कूल ॲंड कॉलेज बुकस्टॉल,
कोल्हापूर.





मुद्रक—
माधव जयराम पाध्ये,
श्री लक्ष्मी-नारायण प्रेस
कोल्हापूर.

# प्रास्ताविक

माझ्या लघुकथांचा हा दुसरा संग्रह वाचकांच्या हातीं देतांना माझ्या मनाला समाधान वाटत आहे. यापूर्वीच्या माझ्या (‘विश्रांति’) कथा-संग्रहाबद्दल रसिक वाचक, व्यासंगी विद्वान आणि लोकप्रिय नियतकालिकें यांनीं जे प्रशंसेचे, उत्तेजनाचे शद्ब काढले त्याबद्दल मी त्या सर्वांचा अत्यंत ऋणी आहे. या नव्या संग्रहाबद्दलही त्यांनीं पूर्वींचीच आपुलकी मनांत ठेवावी अशी विनंति आहे.

कांहीं चिंतातुर जंतूंच्या समाधानासाठीं सांगावें लागतेंच की या संग्रहांतील नांवें, प्रसंग, व्यक्तिवर्णनें हीं सर्व काल्पनिक आहेत. केवळ नांव एक आलें कीं कथा आपल्याला उद्देशून लिहिली असावी असा गैरसमज कोणी करून घेऊं नये अशी कळकळीची विनंति आहे. जोंपर्यंत श्री. ‘अ’, कु. ‘ब’ व श्रीमती ‘क’ अशा नांवानीं कथा लिहिण्याची पद्धति रुढ होत नाहीं तोंपर्यंत कथाकादंबऱ्यांतील नांवाचे स्त्रीपुरुष या अफाट देशांत कुठें ना कुठें तरी सांपडणारच. अशांनी तावडतोब डोक्यांत राख घालून घेण्यास, किंवा “अहो तो मी नव्हे !” अशी हांकाटी करण्यास सुरुवात करूं नये अशी विनंति आहे.

या संग्रहांतील कथा यापूर्वी ज्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या त्या सर्वांचे कृतज्ञताबुद्धीनें मी आभार मानतों. कोल्हापूरचे सुशिक्षित व स्नेहपूर्ण प्रकाशक श्री. दा. ना. मोघे यांच्या आपुलकीबद्दल आभार व्यक्त करणें मी माझें कर्तव्यच समजतों. कथांबद्दल वाचकांनीं आपलीं मतें, टीका, सूचना, अपेक्षा मला कळविल्यास मी त्यांचा ऋणी राहीन.

विलिंग्डन कॉलेज,
सांगली.

रसिकांचा नम्र सेवक
**भा. म. गोरे**

# प्रो. भा. म. गोरे,

एम्. ए.

## यांचें वाङ्मय [ प्रकाशित ]

१) आधुनिक आङ्ग्ल वाङ्मय (टीका) चित्रशाळा, पुणें.
२) नवी पालवी (लघुतमकथासंग्रह) चित्रशाळा पुणें.
३) विद्याविनोद (कादंबरी) सुरसग्रंथमाला, पुणें.
४) नवें निशाण (प्रातिनिधिक लघुतमकथासंग्रह) चित्रशाळा, पुणें.
५) विश्रांति (लघुकथासंग्रह) दा. ना. मोघे प्रकाशन, कोल्हापूर.
६) गलिव्हरचे प्रवास (बालवाङ्मय) के. भि. ढवळे, मुंबई.
७) रिप् व्हॅन् विंकल ( ,, ) स्वाध्यायमाला, पुणें.
८) गुलाबांचा मळा ( ,, ) ,, ,,
९) लिली आणि मोगरा (लघुकथासंग्रह–अनुवादित) चित्रशाळा, पुणें.
१०) नवी वसाहत (लघुकथासंग्रह) दा. ना. मोघे प्रकाशन, कोल्हापूर.
11) Writings and Speeches of Dr. R. P. Paranjpye (संपादित) कर्नाटक प्रेस, मुंबई.

## छापत आहेत

१२) चमकत्या चांदण्या (प्रातिनिधिक लघुतमकथासंग्रह) चित्रशाळा, पुणें.
१३) दिवाळीच्या दिवशीं (कादंबरी) महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई.
१४) अर्धी मजल (श्री. कन्हैयालाल मुनशी, आत्मचरित–रूपांतर) भारतीय विद्याभुवन, मुंबई.
१५) यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली (रूपांतर) डी. बी. तारापोरवाला, मुंबई.
१६) स्वातीचे थेंब (लघुतमकथासंग्रह) के. भि. ढवळे, मुंबई.
१७) स्मितप्रभा (प्रातिनिधिक विनोदी कथासंग्रह) मातृभूमि प्रकाशन, अकोला.

# पलायन

(१)

रंगून पडलं त्या दिवसाची गोष्ट. त्या दिवशीं मुंबईत कोण हाहाःकार ! ‘ आता मुंबईवर हल्ला होणार ! दिवसांचा नाहीतर तासांचाच प्रश्न ! ’ असे उद्गार सारे काढूं लागले. वाळकेश्वर, मरीन ड्राइव्ह तर काय, परळ-गिरगांवदेखील खाली होऊं लागलं.

धीरजलाल शेठ मात्र आपल्या नांवाप्रमाणंच धीराचे खरे. आपलं कापडाचं दुकान अन् शेअर बझारमधले सौदे सांभाळून ते अजून मुंबईत होते -पुढंहि तसेच राहाणार होते, पण -

त्या दिवशीं दुपारीं ते ‘मुंबई समाचार’ चाळीत बसले असतां शेजारीं ‘बसायला’ गेलेली त्यांची चतुर्थ पत्नी विद्यागौरी आपला पावणेदोनशे पौंडांचा देह सावरीत, धापा टाकीत त्यांच्या शेजारच्या खुर्चीवर येऊन कोसळली. पदरानं तोंड पुसून ती किंचाळली -

‘ चालो ! व्हाला ! हवे अहीं नहीं रहूं—मारा पीट्या जापानी काले बुंबा फेकीने आखी मुंबई ऊडाडी देशे. ’ ( चला गडे, आता इथं नाहीं राहायचं. उद्या ते मेले जपानी बॉंब टाकून सारी मुंबई उडवून देणार आहेत ! )

वयस्क प्रेमाच्या हळुवारपणें तिच्या पाठीवर हात फिरवून धीरजलाल म्हणाले, ‘ आजे शूं नवुं भूत भरायूं छे ? लोको मूरख छे ’ ( आज काय नवं भूत शिरलंय अंगांत ! कांहीं होत नाही मूर्ख लोक कांहींतरी बकतात. )

आपल्या मनाविरुद्ध डाव जातो असं पाहिलं म्हणजे विद्यागौरी आपलं शेवटलं ब्रम्हास्त्र बाहेर काढीत. खुर्चीवरून खाली सरकून त्यांनी गालीच्यावर लोळण घेतली, अंग ताठ करून दोन्ही पाय वरखाली नाचविण्यास सुरवात केली. बरोबर ओरड चालू होतीच - ‘ ओ माडी ! मारे नथी रेहवुं. मरी

गइरे माडी. ' ( आईग ! मरून जाईन मी. मला नाहीं राहायचं. ) हिस्टीरियाच्या फिट्चा हा अवतार पाहून धीरजलालांचं अवसान लोपलं. उतार वयांत पांच हजार रुपये खर्च करून आणलेली ही चवथी बायको अशा फिट्मध्ये खरोखरच खलास झाली तर-? कपाटांतून कोलन वॉटर काढून त्याची घडी त्यांनी विद्यागौरीच्या कपाळावर ठेवली, अमोनियाची बाटली नाकाशीं धरली आणि कानांत सांगितलं, 'मारी व्हाली ! ताराथी मने मुंबई प्यारी नथी. कालेज उपडीशूं. ' ( लाडके, तुझ्याहून मुंबई मला अधिक नाहीं. उद्याच निघूं आपण. )

आणि लागलीच विद्यागौरीची 'फिट्' उतरली. धीरजलालांच्या खांद्यावर डोकं लपवून त्यांच्या रुपेरी केसांतून तिनं हळुवारपणें बोटं फिरविलीं —आणि धीरजलालांना धन्यता वाटली.

त्यांनी नाणाबाजारकडे खेप टाकली. चाळीसचं सोनं एकूणसाठ रुपये अन् चौसष्टची चांदी नव्वदावर चढली होती. टाटा बर्मासारखे मजबूत शेअर शेकड्यांनी गडगडले होते. सिक्युरिटीज गुपचूप येईल त्या भावानें लोक विकीत हो.ते. धीरजलालांनी शेअर, प्रामीसरी नोट विकून सोन्याच्या चिपा विकत घेतल्या. कापड दुकान एका नातलगाला चालवायला दिलं. घाईघाईत करतां येईल तितकी व्यवस्था करून ते सपत्नीक बॉबे सेंट्रल स्टेशनवर येऊन थडकले.

सेंट्रल स्टेशनला माघमेळ्यासारख्या जत्रेचं स्वरूप आलं होतं. पांच-सहा दिवस तिकिटाच्या आशेनं बसून उघड्यावर जेवणारीं, झोपणारीं हजारो कुटुंबं सर्वत्र पसरलीं होतीं. थर्डसेकंड तर राहोच, पण फर्स्ट क्लासचीं पुढच्या पंधरा दिवसांचीं तिकिटं अगाऊ खलास झाल्याचं त्यांना कळलं. शेवटीं सिनेमा थिएटरबाहेर फिरणाऱ्या लोकांप्रमाणंच चौपट-पांचपट किंमतीला तिकिटं विकणाऱ्या एका गुंडाकडून धीरजलालांनी फर्स्ट क्लासचीं सुरतचीं दोन तिकिटं मुष्किलीनं मिळविलीं आणि मुंबई सोडली.

सुरत जवळच्या 'खंडेरगाम' नांवाच्या एका खेड्यांतल्या आपल्या दूरच्या नातलगाला पत्र टाकून आपल्यासाठी जागा धरून ठेवण्यास धीरज-

लालांनी कळविलं होतं, या विचारानं त्यांना पुनःपुन्हा हायसं वाटे. सुरत स्टेशनावरच्या धिप्पाड, अडदांड 'गोलणी' बायांनी प्लॅटफॉर्मवर शिरून भराभर त्यांचं सामान बाहेर काढून फेकलं. त्यांना पैसे देतांना, त्यांची समजूत काढतांना मात्र धीरजलालांना ब्रम्हांड आठवलं. उघड्या मांसल मांड्यांवर येणारा परकर-लुगड्याचा काचा घालून, कंबरेवर हात ठेवून उभ्या टाकलेल्या त्या मर्दानी महामायांनी आपल्या 'ह'कारयुक्त सुरती शिवराळपणानं धीरजलालांच्या सात पिढ्या उद्धरल्या.

विद्यागौरी मात्र या साऱ्या प्रकाराकडे बेफिकीरीनं पाहात, स्टेशनवर घेतलेल्या सुरती बर्फीच्या पुड्यावर ताव मारीत, सामानाच्या ढिगाऱ्यावर बसून राहिली होती. शेवटीं एका 'वीशींत [ खानावळींत ] कदान्न खाऊन दोन बैलगाड्या ठरवून धीरजलालांनी खेड्याकडे कूच केलं.

मुंबईच्या मउ गादीवाल्या व्हिक्टोरिया, बस्, टॅक्सींतून हिंडणाऱ्या विद्यागौरीला या गाड्यांतल्या प्रवासाची मात्र जन्मभर आठवण राहिली. तापी नदीच्या 'भेखड' [दरडी] वरून मोकाट सुटलेल्या गाड्यांतलीं माणसं कमानदार छपरापर्यंत थाडथाड उडत होतीं. एकमेकांवर जोरानं आपटून धीरजलाल अन् विद्यागौरीच्या कपाळांना चांगलीं उंच टेंगळं आलीं. एकदा तर बैलाचा पाय घसरून त्यांचा गाडा सफाई उलटला व विद्यागौरी एखाद्या पिपासारखी 'भेखड'च्या काठावरून खाली नदीतीरापर्यंत गडगडत गेली. जीव वांचला हीच खैर !

हाडें खिळखिळीं करणाऱ्या सहा तासांच्या प्रवासानंतर धीरजलाल 'खंडेरगाम'च्या 'भागोळ' (वेस) जवळ येऊन पोचले. गाड्या गावांत शिरतांच वेशीजवळ बसलेल्या निरुद्योगी गावगुंडांनी एकच गजर केला–'ममइवाला आव्या ! माळा भागीनं आव्या हंअीआ !' (मुंबअीवाले आले ! साले पळून आले आता इथं.) बाराबंदी व पंचा नेसलेले, हातांत 'धारिये' ( लांब दांड्याचे कोयते ) घेतलेले पुरुष हातांत हुक्का घेउन या गाड्यांकडे बघत रस्त्यावर दुतर्फा जमले. पाठीवर बंद बांधलेल्या काचोळ्या, आखूड लाल

परकर आणि फाटक्या साड्या या वेषांतल्या बायका अर्ध्या तोंडावर पदर [ लाज ] घेऊन, चोरून त्यांच्याकडे पाहात कुजबुजत होत्या. धीरजलालांना गावांतला हा प्रवास एखाद्या धिंडीसारखा लाजिरवाणा वाटला.

दुपारीं जेवण झाल्यावर पडक्या भिंतींच्या अंगणांत टाकलेल्या खाटेवर बसून त्यांनीं नातलगाजवळ जागेची गोष्ट काढली. जागेचे मालकहि येऊन बसले होते. मद्रास-मुंबईकडून आलेल्या लोकांनी वर्षावर्षांचीं भाडीं आगाऊ देउन साऱ्या खेड्यांतल्या जागा कशा अडकवून ठेवल्या हें त्यानं सविस्तर सांगितलं. उरलेली एक जागा आपली—तीहि नातलगमजकुरांचा स्नेह जाणून फक्त पन्नास रुपये महिना भाड्यानं देण्याची आपली तयारी आहे हेंही त्यानं सांगितलं.

धीरजलाल जागा पाहायला उठले-पण पाहाणार काय ! कशाबशा उभ्या असलेल्या चार मातीच्या भिंती असल्यानं त्याला 'घर' म्हणायचं एवढंच. मागच्या दाराजवळची भिंत कोसळून तिथं विटांचा ढीग पडला होता. छप्पर चंद्रमौळी, दारांना कड्या नव्हत्याच ! नाइलाजानं पन्नासाच्या नोटा त्याच्या हातावर टाकून धीरजलाल आणि विद्यागौरींनी नवा गृहप्रवेश केला.

खुर्चीवरून ताटावर बसणाऱ्या विद्यागौरीला तीन दगड मांडल्यावर मात्र ब्रम्हांड आठवलं ! धुरानं तिचा जीव गुदमरला ! डोळ्याच्या धारांनी चूल विझण्याची पाळी आली ! शेवटीं धीरजलालांनाच खिचडीची हंडी उतरावी लागली ! अशा कुग्रामांतहि बंगलोरी टोप्या घातलेले शहरचे शेटजी आणि पायांतल्या पैंजणांचा छुनक् छुनक् आवाज करीत फिरणाऱ्या त्यांच्या शेटाणी त्यांना दिसल्या. या लोकांच्या येण्यानं खेड्यांतल्या लोकांना मात्र स्वर्ग हातीं आल्यागत वाटत होतं. पांचपांच रुपये देउन भांडीं घासायला बाई मिळेना ! भरपूर पाणी मिसळलेलं दूध रुपयाला दोन शेरहि गवळी घालीना ! टिनचीं डबडीं अन् पोतीं यांत माल भरून उघड्यावर बसलेल्या दोन मारवाडी दुकानदारांना तर 'व्हाईटवे लेडलॉ'चा अभिमान चढला होता !

नाविन्याचे चार दिवस हिंडण्याफिरण्यांत गेले. पुढं मात्र या कुग्रामांत धीरजलाल अन् विद्यागौरीला अगदी कंटाळवाणं वाटूं लागलं. दुसरं कांहीच

काम नसल्यानं मागच्या उखाळ्या पाखाळ्या काढून रोज कडकडून भांडावं, फिट् आणावी हा विद्यागौरीचा दिवसाचा क्रम, आणि तिची मनधरणी, विनवणी करून मर्जी ठिकाणावर आणणं हा धीरजलालांचा रात्रीचा प्रोग्राम ! चार मैल दूर असलेल्या एका इनामदाराकडे येणारें वृत्तपत्र ते रोज आधाशी-पणें वाचून येत. आता मुंबईवर बॉंबहल्ला केव्हा होतो आणि बाहेर पडण्याचा आपला शहाणपणा समर्थनीय केव्हा ठरतो याची ते आतुरतेनं वाट पाहात होते. पण तसं कांहीच वृत्त कळेना ! उलट तुरळक हल्ल्यांपलीकडे हिंदुस्थानला संघटित आक्रमणाचं भय नाहीं असंच रोज वाचण्यांत येई अन् त्यांना उगीचच संताप येई.

अशा संत्रस्त परिस्थितींत धीरजलाल दिवस काढीत होते. त्यांतच एक दिवशीं एक भलताच प्रकार घडला.

काळोख्या रात्रीं दोन वाजण्याचा सुमार असेल. मागच्या दारीं कांहीं आवाज ऐकून धीरजलाल दचकून जागे झाले. दाराजवळच्या पडक्या भिताडावरून दोन काळ्या आकृति उडी मारून आंत आल्या हें त्यांना बारीक केलेल्या दिव्याच्या अंधुक प्रकाशांत दिसलं. त्यांच्या साऱ्या अंगाला घाम सुटला-जीभ टाळ्याला चिकटली. खूप जोर करूनहि शब्द तोंडाबाहेर फुटेना ! तेवढ्यांत एका काळ्याकभिन्न व्यक्तीनं त्यांच्या छातीवर एक गुढगा रोवला. दुसऱ्यानं आपला राकट पंजा विद्यागौरीच्या तोंडावर दाबला. डोळे उघडून समोरचं दृश्य पाहिल्यावर तिचे डोळे पांढरे झाले ! या वेळीं मात्र तिला खरोखरची फिट् आली !

इकडे पहिल्या चोरानं धीरजलालांचा गळा दाबून दरडावून प्रश्न केला–' हाळा मुंबैवाळा ! बताव क्यां मूक्या छे पैसा–नकर मुवोज हमज !' (साल्या, मुंबईवाल्या ! कुठं आहेत पैसे ते दाखीव, नाहीतर मेलास समज. )

प्रथम तर आपण गरीब आहोंत, आपल्याजवळ कांही नाही म्हणून धीरजलालांनी बराच आव आणला.

'अम नही माने हालो' (अशानं नाहीं ऐकायचा तो) म्हणून त्याच्या दुसऱ्या साथीदारानं अंगावरच्या काळ्या घोंगडींतून एक लांब, जाड पात्यांची कात्री बाहेर काढली अन् असा एक विचित्र अंगविक्षेप केला, की 'ना–ना बापा ! बधुं बतावूं–गाय छूं हूं' (नको, नको बाबा, सारं दाखवतों. तुझ्यापुढं गाय आहे मी) म्हणून धीरजलालांनीं हात जोडले. अंगणांत पुरून ठेवलेला सोन्याच्या चिपांचा डबा त्यांनी दाखविला. तो घोंगडींत गुंडाळून जातांजातां चोरांनी त्यांना दम भरला, 'बूम मारीश तो तू ने तारी बौ–बन्ने मुवाज हमजजे–काले आवीने कटका करी नाखशूं !' (ओरडलास तर तूं न् तुझी बायको मेलीच समज. उद्या येऊन खांडोळी करून टाकूं !)

दहापंधरा मिनिटांचा सारा प्रकार असेल. आले तसे ते चोरटे नाहीसे झाले. अशब्दपणें हुंदके देत, अश्रू ढाळीत धीरजलाल हताश होऊन पडले होते. आपण ओरडलों अन् न जाणों चोरटे परत आले तर–!

पहाटेस झुंजुरकं झालं. शेताकडे बैल जाऊं लागले. त्यांच्या गळ्यांतली घुंगरं, शेतकऱ्यांनी राकट आवाजांत ललकारलेलीं भजनं, या आवाजांनीं विद्यागौरी शुद्धीवर आली आणि तिनं एक किंकाळी फोडली. उजाडलेलं पाहून धीरजलालांनीहि आरडाओरड केली. सारा गाव त्यांच्या घरापुढं गोळा झाला. साऱ्या पंचक्रोशींत दरारा असलेल्या 'बाबरो भूत' नांवानं ओळखल्या जाणाऱ्या दरोडेखोराचं हें काम असावं असं साऱ्यांनी सांगितलं.

दुपारीं कपाळाला हात लावून बसलेल्या धीरजलालांच्या जवळ येऊन विद्यागौरी पुन्हा स्फुंदु लागली. मुंबईहून निघण्यासाठी केला तसाच हट्ट आता मुंबईला परत जाण्यासाठी ती करूं लागली. 'चोरना छरीथी मरवा करता जापानीओना बुंबाथी मरवू सारूं. चालो पाछा मुंबई.' (चोराच्या सुऱ्यानं मरण्यापेक्षा जपानी बॉबनं मरणं बरं. चला परत मुंबईला.) जमिनीवर लोळण घेऊन, अंग ताठ करून, पावलं वरखाली नाचवीत विद्यागौरीनं पुन्हा हिस्टीरियाची फिट आणली. ती पाहून धीरजलालांचे रागाचे शब्द ओठा-वरच विरले.

झाल्या प्रकारांत भाग्य येवढंच, की खूप ऐवज अेकदम मिळाल्यानं चोरट्यांनी विद्यागौरीच्या बांगड्या, गळसर, सौभाग्य लेण्यांना हात लावला नव्हता. लांबच्या एका इनामदाराकडे एक बांगडी मोडून धीरजलालांनी आली ती रक्कम उभी केली.

दुसऱ्या दिवशीं पुन्हा खिळखिळ्या खटाऱ्यांतून धीरजलाल अन् विद्या-गौरी यांची मिरवणूक खेड्यांतून परत निघाली. हुक्क्याची नळी तोंडांत धरलेले खेडूत, अर्ध्या तोंडावर पदर घेतलेल्या स्त्रिया या आता त्यांच्याकडे पाहात, फिदीफिदी हसत होत्या. कुठूनतरी त्यांच्या अंगावर मातीचीं ढेकळं अन् खडे यांचा वर्षाव होत होता. पुन्हा सहा तासांचा गाड्याचा प्रवास, पुन्हा शिव्या देणाऱ्या मर्दांनी 'गोलणीं' कडून सामानाची फेकाफेक आणि शेवटीं पुन्हा मुंबई !

धीरजलालांनी पाहिलं तर शहरांतले सारे व्यवहार पूर्वीसारखेच चालले होते. लोकल, ट्राम, बस, व्हिक्टोरिया चिकार भरून धावत होत्या. दुकानं, सिनेमागृहं यांत लोकांची रीघ लागली होती.

वीस वर्षांची कमाई आपल्या पत्नीच्या घाबरटपणामुळं आणि आपल्या स्त्रैण लाचारीमुळं घालवून धीरजलाल पुन्हा आपल्या दुकानांत येऊन बसले. आणि तेव्हाच मनाच्या कोपऱ्यांत कुठंतरी लागलेली आग शांत झाल्यासारखं त्यांना वाटलं. पहाटेस दुकान उघडून गज आणि कात्री यांना त्यांनी हळदीकुंकू वाहिलं, गल्ल्यांतल्या श्रीशिलकेला नमस्कार केला आणि दारांतून येणाऱ्या पहिल्या गिऱ्हाइकाकडे ते हसतमुखानं वळले !

( मनोहर मासिकाच्या चढाओढीत
पहिलं बक्षिस मिळालेली लघुकथा )
[१९४२]

# रोमिओ-ज्यूलिएट (२)

ती एक रोमिओशिवायची ज्यूलिएट होती; कारण तिला मागणी घाल-ण्याचें धाडस अजून कोणाही तरुणानें केलें नव्हतें. तिच्या काजळी चेहऱ्या-वरील मुरुमाचे उंचवटे, अंजिरी ओंठाआडून बाहेर डोकावणारी विरळ दातांची फौज आणि एखाद्या पिपासारखा बसकट जाड बांधा—प्रथम दर्शनानेंच कितीही 'चढाऊ' वृत्तीचा प्रेमवीर असला तरी तो एकदम माघार घेत असे !

तिच्या घरच्या श्रीमंतीमुळें कांहीं गरीब आणि गरजूवृत्तीचीं स्थळें घरच्या पुरोहितानें आणलीं; पण अशा रीतीनें कमीपणा घेउन, एखाद्या कंगाल अनोळखी माणसाच्या हातीं आपली मान देणें तिला बिलकूल पसंत नव्हतें. प्रथमदर्शनी प्रेमावर तिचा मनापासून विश्वास होता. एखाद्या श्रीमंत गुलहौशी तरुणाशीं प्रेम जमल्यावर मग लग्न करावें, जोड्यानें सहलीला जावें, सिनेमा पाहावा...

पुरुषांनीं कौतुकानें आणि स्त्रियांनीं मत्सरानें आपल्याकडे पाहावें अशा तिच्या उमेदी होत्या. 'असं असलं तरच लग्न करीन नाहींतर जन्मभर कुंवार राहून देशसेवा करीन !' असें तिनें आईला निक्षून बजाविलें होतें.

इतकें झालें तरी ती माउली दर आठ-पंधरा दिवसांनीं एखादें सामान्य स्थळ आणून तें आपल्या लाडक्या मुलीच्या मनांत भरविण्याचा प्रयत्न करीत असे. डोळ्यांत पाणी आणून ती म्हणे, 'बघ बाई सुले ! बायकांचा जल्म म्हंजे संकष्टांची खाण असते बरं ! त्यांतनं तुझं रूप जरा असं पडलं. आपला गौण पक्ष आहे. कबूल करायलाच हवा. नाहीं म्हणून काय करणार ? मी बाई नाहीं कॉलेज शिकलेली तुझ्यासारखी. पण माझं अनुभवाचं बोलणं ऐकशील तर आपली या स्थळीं लग्न करून मोकळी हो बाई ! अजून कवळं

वय आहे तुझं. एकदां जून दिसायला लागलीस म्हंजे अशीं हीं स्थळं यायचीं नाहींत. बायकांनीं रूप आणि पुरुषांनीं कुवत पाहून मगच मनांत आशा बांधाव्यात बरं. म्हंजे पदरीं पस्तावा यायचा नाहीं!'

अशाच नित्याच्या कटकटींनं डोकं उठून, त्रासून, सुलोचना आज रोमिओ-ज्यूलिएटच्या संध्याकाळच्या खेळाला येऊन बसली होती. फर्स्ट-क्लासच्या मऊमऊ स्प्रिंगदार खुर्चीवर, पंख्याखालीं बसूनही तिचा जीव गुदमरत होता. स्वतःवरच ती चिडल्यासारखी झाली होती. तिनें भोंवतालीं पाहिलं. जिकडे—तिकडे तरुण स्त्रीपुरुषांच्या जोड्या खेटून बसल्या होत्या.

—कारणाशिवाय जवळ तोंड नेऊन कुजबुजत होत्या. त्या हसत, या हंसत. फेरीवाल्या पोरांना बोलवून चॉकोलेट, शेंगा, लेमनवर ताव मारीत.

सुलोचनेनें आपले डोळे झांकून घेतले.

तिसरी घंटा झाली. पडद्यावर बिड्या—काड्या, कापड, मिठाई कार-खानदारांच्या जाहिराती फडकूं लागल्या. सुलीनें डोळ्याच्या कोपऱ्यांतून जरा पलीकडे बसलेल्या जोडप्याकडे पाहिलें. त्यांचीं डोकीं अगदीं जवळ आलीं होतीं.

अगदीं रक्त फुटेपर्यंत तिनें दातांनीं आपला खालचा ओठ चावला —आणि शेजारच्या रिकाम्या खुर्चीकडे शून्यपणें पाहिलें.

जाहिराती संपून रोमिओ—ज्यूलिएटच्या अमर प्रणयकथेला सुरवात झाली. ज्यूलिएटच्या सुंदर, अल्लड वेषांत नॉर्मा शिअरर पडद्यावर येतांच थिएटरमध्यें टाळ्या पडल्या.

येवढ्यांत फर्स्ट—क्लासच्या दारावरचा काळा पडदा जरा दूर झाला आणि डोअर—कीपरच्या टॉर्चचा उजेड फरशीवर पडला. त्याच्या मागोमाग सुटाबुटांतला एक ऊंच, उमदा तरुण जागा शोधीत, अंग चोरून आंत आला. सुलोचनेच्या शेजारच्या सीटवर तो येउन बसला. तोंडाला स्नो, केसावर शिंपडलेलें सुगंधी विलायती तेल आणि त्यानें ऐटीनें शिलगावलेली ऊंची सिगारेट यांचा मिश्र सुवास त्याच्या भोंवतीं दरवळत होता.

रोमिओ आणि ज्यूलिएट यांच्या प्रणयाचें उन्मादक वातावरण आतां साऱ्या थिएटरभर पसरलें होतें. दोन सीटमधील खुर्चीच्या हातावर मनगट टेकून, घट्ट मूठ आवळून बसलेल्या सुलीला या प्रसंगाशी तन्मय होतां येइना. विमनस्कपणें ती पडद्याकडे पाहात होती.

—तिच्या हाताला एक ओझरता स्पर्श झाला आणि तिच्या अंगांतून एक विजेचा झटका शहारून गेला.

तिनें आपला हात बाजूला केला नाहीं ! कांहीं क्षणांनीं तो ओझरता स्पर्श जरा धीट झाला. दोन पंजांचीं बोटें एकत्र जुळलीं आणि आतां मात्र ती ज्यूलिएटच्या प्रणयानुभवाशीं अगदीं तन्मय होऊन सारे प्रसंग पाहूं लागली.

मध्यन्तराचे दिवे लागले. सुलीनें हळूंच आपला हात सोडवून घेतला.

" चहा, कॉफी, सोडा-लेमन, विडी, सिगारेट ! " कानावर हात ठेवून कर्कश सुरांत पोरें केंकाटूं लागलीं. तबकांत चहाचे पेले घेऊन येणारे नोकर खुर्च्यांवर बसलेल्या लोकांना धक्के देत अरुंद रांगांतून फिरूं लागले.

सुलीच्या खुर्चीजवळ येऊन एका पोऱ्यानें विचारलें, ' चहा साहेब, चहा बाईसाहेब ? ' त्या विचारण्यांत गृहीत धरलेला अर्थ लक्षांत येऊन सुली गोंधळली. त्या तरुणानें जरा हंसून तिच्याकडे पाहिलें. तो म्हणाला, ' चहा घेतां का थोडा ? '

सुलीच्या हृदयाचे ठोके जोरजोरानें पडूं लागले. उगीचच केस सांवरीत ती कांपऱ्या आवाजांत म्हणाली, ' अंहं ! मी कधींच चहा घेत नाहीं. '

' पण आज ? ' त्यानें हंसत तिच्याकडे पाहिलें.

' आज ' ह्या साध्या शब्दांतला गूढार्थ कळून तिला नवाच आनंद झाला. तिची मान खालीं वळली. तिच्या संमतीची वाट न पाहातांच त्यानें दोन पेले मागविले. एक तिच्यापुढें करून तो म्हणाला, ' हं, घ्या ना ! '

कसल्यातरी तंद्रींतच तिनें तो कप घेतला. किती गोड वाटला तिला तो चहा ! कप परत देऊन ती आपल्या पर्सच्या आंतल्या कप्पांतील नोटांच्या आड असलेली मोड धुंडाळूं लागली.

' अंहं ! तो मान आज आमचा आहे. ' त्यांनें पोऱ्याच्या तबकांत ऐटीनें एक रुपयाची नोट फेंकली. त्याच्या सहज बोलण्यांत आणि हाल-चालींतही आकर्षक रुबाबदारपणा होता.

मध्यंतराचे दिवे मालवले.

पुन्हां सुलीच्या हातावर त्याचा हात पडला. तिनें हलकेंच पलीकडे सरकून त्याच्या खांद्यावर मान टेकली. पडद्यावरच्या पार्श्वसंगीताचे सूर तिच्या कानांत घुमत होते. पडद्यावरील चित्रापेक्षांही अधिक आकर्षक, अधिक उन्मादक चित्रें तिच्या मनाच्या पडद्यावर नाचत, डोलत होतीं. त्या विचा-रांच्या भरांत तिनें डोळे झांकून घेतले.

··· ··· ··· तिचे बेत चालले होते, "आतां सिनेमा सुटल्यावर यांचं नांव विचारून घ्यायचं व पुन्हां भेटण्याची वेळ ठरवून घ्यायची. बहुतेक कोणत्यातरी कॉलेजमध्येंच शिकत असले पाहिजेत ते. अन् आज टाइम्समध्यें काय जाहिरात वाचली बरं ? – हं, ' सिल्व्हर स्नो ' गॅरंटीनं काळ्याचं गोरं होतां येतं म्हणे ! पांच रुपये पडतात एक पॅाटला. दोन पॅाट्स् घेऊन टाकायचीं एकदम. अन् मग तडक त्या मीना स्टोअर्समध्यें जायचं अन् ती मागं पाहिलेली शंभर रुपयांची जार्जेटची जरीसाडी घेऊन टाकायची. किती दिवस झाले, आई जवळून पैसे मुद्दां घेऊन ठेवलेत पर्समध्यें. पण मला उत्साहच वाटत नव्हता कशांत ! कशाला घ्यायची भारी साडी ? कोण पाहाणार आहे तिकडे ? कोण करणार आहे कौतुक आपलं ? असं वाटे. पण आतां ?"

'... . हो ! अशीच ओळख टिकवायची आतां; अन् मग बाबांची भेट करून द्यायची. किती मागतील तेवढा हुंडा हट्ट करून त्यांना देववावयाचा. शिक्षण नि नोकरीची हमी द्यायची. हो त्याच्याशिवाय माझा तरी कसा दाब राहील ? थोडे उपकार वाटायला हवेतच त्याना अन् मग लग्नांत मुद्दाम त्या कमळीला अन् रजनीला बोलवायचं. अशा हिणवीत होत्या सटव्या मला ! अश्शी नाकं ठेंचीन त्यांचीं बोलून बोलून –'

अशा विचारांत, भावी सुखस्वप्नांतच तिचा उरलेला वेळ गेला. पड-द्यावरच्या ज्यूलिएटच्या प्रणयाचा दुःखी शेवट तिनें पाहिलाच नाहीं. सिनेमा संपल्यावर ती दोघें रस्त्यावर आलीं. पुष्कळ बोलायचें, पुष्कळ विचारायचें, म्हणून तिनें मनांत किती निश्चय करून ठेवले होते. पण आतां तिच्या तोंडून एक शब्दही बाहेर फुटेना. ती भीतभीत एवढेंच म्हणाली, 'जातें बाई मी! उ–उद्यां भेटाल ?'

हंसून त्यानें आपली हॅट जरा डोक्यावरून उचलली. 'उद्यां संध्याकाळीं सहा वाजतां याल ह्या थिएटरजवळ ? फिरायला जाऊं आपण अं ? बाय्! बाय्!' शीळ घालीत, लांब पावलें टाकीत तो प्रेक्षकांच्या गर्दींत नाहींसा झाला.

स्वप्नांत अजून तरंगल्यागत होऊन सुलोचना मीना स्टोअर्सजवळ आली. झगझगीत दिव्यांच्या प्रकाशांत, कांचेआड ठेवलेलीं पातळें पाहून तिनें आपली पर्स उघडली.

–आणि तिच्या तोंडून एक किंकाळीच बाहेर पडली. तिची पर्स साफ रिकामीच झाली होती. तिनें बाहेर काढलेल्या हाताच्या बोटांत घातलेली तिची आवडीची हिऱ्याची आंगठीही नाहींशी झाली होती.

सारा रस्ता तिच्या भोंवतीं गरगर फिरूं लागला.

कितीतरी वेळ कपाळाला हात टेकून ती दुकानाच्या एका अंधाऱ्या कोपऱ्यांतल्या फळीवर बसली होती.

शेवटीं कष्टानें उठून ती हळूंहळूं आपल्या घरीं आली.

...रात्रीं बाराचा सुमार झाला होता. सारी निजानीज झाली होती. सुलीनें गुदमरलेल्या आवाजांत हांक मारली, "आई!"

"कोण सुलू ? अजून झोंपली नाहींस ?" तिची आई आश्चर्यानें उद्गारली. कांहीं उत्तर न देतां सुलूनें आईला मिठी मारली व तिच्या कुशींत आपलें डोकें लपविलें. जोराच्या हुंदक्यांनीं तिचें सारें अंग कांपत होतें. कांहीं न बोलतां आईनें तिला जवळ घेऊन तिच्या अंगावरून हात फिरवला.

हुंदक्याचे उमाळे थांबल्यावर तिनें हळूंच पुन्हां हांक मारली, "आई!"

"काय बाळ?"

"दुपारीं तूं सांगितलं होतंस ना त्या स्थळाला होकार द्यायचा उद्यां!"

"तरीच माझी शहाणी बाळ हो!" म्हणून तिच्या तोंडावरून मायेनें हात फिरवून आईनें तिला घट्ट जवळ ओढून घेतलें.

परंतु असा होकार देऊनही, मुली रात्री झोंपेंतही हुंदके देऊन कां रडत राहिली हें तिला कळलें नाहीं!

('महाद्वार' मासिकानें चढाओढींत
दुसरें पारितोषिक दिलेली कथा)
[१९४४]

# सर्पाची जात ! (३)

शंभर सापांच्या फुसकारण्यासारखा आवाज करून पूना मेल बोरी-बंदरच्या स्टेशनावर थांबली; आणि लाल शर्टवाल्या हमालांच्या पलटणीनें गाडीवर हल्ला चढविला. त्यापैकीं एकाच्या डोक्यावर माझी बॅग देऊन मी खालीं उतरलों. कुठें रहावें म्हणून महाराष्ट्रीय, गुजराती हॉटेलांच्या नांवांची उजळणी करीत, त्यांच्या एजंटासाठीं इकडेतिकडे पहात त्या लांबलचक प्लॅट-फॉर्मवरून मी बाहेर पडलों. तिकिटाच्या दाराशींच फिकटसा, निस्तेज, गाल-फडें वर आलेला माझ्या जुन्या ओळखीचा एक चेहरा दिसला. मी हांक मारली,—" कोण श्रीधर ! इकडे कुठें ?"

तो चपापून म्हणाला,— " शांताराम जोशी ? केव्हां आलास ? मी इथं दवाबाजारांत नोकरीला आहें. पुण्याचे कोणी जोशी खरेदीसाठी येणार आहेत त्याना उतरून घ्यायला जा म्हणून सांगितलं शेटजीनीं.—तो जोशी...?"

" मीच तो, " मी म्हटलें. " एम्पायर नाहीं तर नृसिंह लॉजमध्यें उतरून नंतर येणार होतों तुमच्या दुकानांत."

" छे ! छे ! असं कधीं झालंय्, शेटजी नुसतं फाडून खातील मला, तुला असं जाऊं दिलं तर. चल माझ्याबरोबर." श्रीधर काकुळतीनें मला म्हणाला.

मी त्याच्याकडे लक्ष देऊन पहात होतों. कॉलेजमध्यें माझ्याबरोबर असतां गोल गरगरीत असलेला, आनंदी, खुशालचेंडू श्रीधर, आणि आतांचा पालीसारखा फटफटीत पडलेला आणि उदास चेहेऱ्याचा श्रीधर, या दोन व्यक्ति एक कीं दोन याचा मला संदेह पडूं लागला. मी त्याला एकदम विचारलं,—

" श्री! फार खराब झालास रे! मुंबईची हवा सोसत नाहीं वाटतं? मला मागं कळलं, कीं तुझं लग्न झालं. तुझ्या आवडीप्रमाणं व्यापारधंद्यांतही तुझा शिरकाव झाला. आतां खरं म्हटलं तर तुझ्या पूर्वीच्या आनंदी स्वभावाला ऊतच यायला हवा होता. पण मघांपासून पहातों आहे, तों अगदीं सुतकी चेहरा करून उभा आहेस तूं. फरशा मोजण्यासाठीं जशी काय तुझी नजर सारखी खालीं. कां रे बाबा असं?"

माझ्या प्रश्नांचं उत्तर न देतां गर्दीनें एक व्हिक्टोरिया बोलावून श्रीधरनें माझी बॅग आंत टाकली. जवळ उभ्या असलेल्या पोऱ्याजवळून दोन वर्तमानपत्रें विकत घेऊन व्हिक्टोरियांत बसल्यावर त्यांतल्या ताज्या बातम्यांत दंग झाल्याचें दाखविलें. जरा वेळानें वृत्तपत्र दूर करून मलाच उलट प्रश्न टाकला,– "काय रे! पुण्यांत केमिस्टचं दुकान काढणार आहेस तूं म्हणे? तुझं बरंय् बाबा, स्वतंत्र आहेस तूं!" असं म्हणून कॉलेजमधल्या एकेक जुन्या मित्राचें नांव घेऊन त्यांचा हल्लींचा ठावठिकाणा, माहिती यांची चौकशी करण्यास त्यानें सुरुवात केली.

तोंपर्यंत आम्ही अर्ध्या वाटेवर आलों होतों. उजवीकडे जवळ जवळ क्रॉफर्ड मार्केटपर्यंत पसरलेलें बोरीबंदरचें स्टेशन, डावीकडे टाइम्स ऑफ इंडिया, अंजुमन-इ-इस्लाम,—जे. जे. स्कूल ऑफ आर्ट यांच्या इमारती, यांवरून पुढें जाऊन एक वळण घेऊन आमची व्हिक्टोरिया 'दवाबाजार' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भागांत येऊन पोंचली होती. पॅकिंगच्या खोक्यांतलें गवत, कार्डबोर्डचे तुकडे, सचित्र जाहिरातींचे कपटे यांचा या बाजारांतील रस्त्यांत आणि फूटपाथवर नुसता खच पडला होता. मोठमोठीं खोकीं फूटपाथवर ठेवून, त्यांच्या पट्ट्या आणि खिळे काढीत असलेले केमिस्ट दुकानांतले नोकर सर्वत्र दिसत होते. एक विशिष्ट प्रकारचा उग्र, कुजट, उग्र औषधी वास या साऱ्या रस्त्यावर छतासारखा पसरला होता.

*D. Nathan & Co.*

अशी लांबलचक लपेटीची सोनेरी पाटी असलेल्या एका मोठ्या दुकानाजवळ

आमची व्हिक्टोरिया येऊन थांबली. माझी वर्दी देण्यासाठीं काउन्टरमधली फळी उलटून श्रीधर आंत गेला. बाहेर खुर्चीवर बसून मी कुतूहलानें या थाटामाटानें सजविलेल्या दुकानाकडे बारकाईनें पाहूं लागलों.

भोंवतालच्या मोठमोठ्या कांचेरी कपाटांतून इंग्रजी, फ्रेंच, अमेरिकन औषधांच्या बाटल्या आणि भडक वेष्टणांचे डबे रचून ठेवले होते. दाराशींच हिरव्या साबणाची वडी हातांत घेऊन स्मित करीत असलेली कार्डबोर्डची पुऱ्या उंचीची इंग्रजी युवती उभी होती. समोरच्या बाजूला आपल्या प्रियतमेचे हात धरून, वांकून, तिचे चुंबन घेण्याच्या पावित्र्यांत उभ्या असलेल्या जोडप्याची कार्डबोर्डची प्रतिमा एका टूथपेस्टची जाहिरात करीत होती. पलीकडच्या कपाटांतून लखलखीत, तीक्ष्ण, शस्त्रक्रियेचीं हत्यारें-खालीं रबरी पिशव्यांचें प्रदर्शन-- गरम पाण्याच्या, बर्फाच्या आणि संततिनियमनाच्याही. साबण, स्नो, पावडर, लिपस्टिक्, पोमेड वगैरे देशीविदेशी सौंदर्यप्रसाधनांचा तर नुसता मीनाबाजार भरला होता. त्यांच्या जाहिरातीप्रमाणें गुण असते तर आख्या मुंबई इलाख्यांतल्या स्त्रियांना एकजात अप्सरा बनविण्याइतका तयार माल तेथें पडला होता.

दुकानाचे मालक येईपर्यंतचा वेळ मी माल आणि गिऱ्हाईकें यांच्या पहाणीत घालविला. मानसशास्त्रावरील दहा पुस्तकें वाचून होणार नाहींत इतकें मनुष्यस्वभावाचें आणि मनोरचनेचें ज्ञान अशा दुकानांत तास अर्धा-तास बसून होईल असें मला वाटूं लागलें. कोणी तरी नांव लिहून दिलेल्या औषधाची चिठी मुंडाशांतून पुढें करणारे भोळसर अशिक्षित-कानावर येईल तें पौष्टिक औषध पोटांत रिचवून अमरपट्टा मिळवूं पहाणारे श्रीमंत रंगेल म्हातारे, असे कितीक येऊन गेले. यापेक्षां विरळा, पण कायम ध्यानांत रहाणाऱ्या कांहीं व्यक्ति माझ्या मनांत अनेक प्रश्न उभे करून निघून गेल्या.

अगदीं खालीं मान घालून, डोळ्याच्या कडेनें इकडे तिकडे पहात, दबत दबत जाणाऱ्या एका तरुण विधवेनें आमच्या दुकानावरून तीनदां फेऱ्या घातल्या असतील. शेवटीं कोणी गिऱ्हाईक नसलेलें पाहून ती घुटम-

ळत आंत आली. मलाच दुकानदार समजून आपल्या मुठींत लपविलेल्या, चोळामोळा झालेल्या कागदाची घडी तिनें थरथरत्या हातानें माझ्या पुढें केली. एका प्रसिद्ध वितळणाऱ्या सांगठ्यांची जाहिरात होती ती. काउंटर-मागील नोकरानें बांधून दिलेली ती तांबडी डबी लपवीत, पैसे टेबलावर फेंकून, चेहऱ्यावरील घाम पुशीत ती क्षणांत पळाली देखील. टूथपेस्ट घेण्यासाठीं म्हणून सतरा प्रकार काढायला सांगून, शेवटीं 'रोगप्रतिबंधक' पेस्टची ट्यूब आहे का, म्हणून कानांत विचारणारे काळवंडलेल्या चेहऱ्याचे कांहीं तरुण; लंगडत येऊन पिचकारीची दवा मागणारे कांहीं मध्यमवयस्क– 'गरम दवा आहे का ?– वाटेल ती किंमत देतों बघा !' म्हणून घाबरत विचारणारे कांहीं संभावित...एक ना दोन, जगांत नीतीच्या बुरख्याखालीं वावरणाऱ्या लोकांचें खरें स्वरूप पहावयाचें असलें तर डॉक्टरचा दवाखाना आणि केमिस्टचें दुकान यांसारख्या मोक्याच्या जागा दुसऱ्या सांपडणार नाहींत, असें मला वाटलें.

मी या अवलोकनांत दंग असतां काउंटरमागून फळीवर करवत घांस-ल्यासारखा एक खरखरीत, घोगरा आवाज आला,–'नमस्कार जोशीसाहेब ! जरा हजामत अन् स्नान आटपीत होतों म्हणून थांबावं लागलं हं तुम्हाला.– तकलीफ माफ करा हं !'

—'छे हो–तकलीफ कसली ?' म्हणून मी मागें वळलों. दवा-बाजारांतले प्रसिद्ध व्यापारी दीनानाथ माझ्यापुढें उभे होते. चाळीस एक वर्षांचें वय, काळा, ठेंगणा, स्थूल देह,–डोक्यावरील भांगाशीं तुरळक झालेले, कुठें कुठें कलप न बसल्यानें काळ्यांतून पांढुरके दिसणारे विरळ केंस, कैफ चढल्यासारखे लालसर, बटबटीत डोळे,–मिशा काढलेले जाड लाल ओंठ, आणि बसकट गळ्यावर टेंकलेला, रुंद जबड्याचा लोंबता स्थूल भाग–असें त्यांचें ध्यान होतें.

एक सिगारेट शिलगावीत ते मला म्हणाले, 'जोशीसाहेब, धंद्याच्या गोष्टी स्वस्थपणें दुपारी बोलूं आपण. सध्यां तुम्ही आमचे पाहुणे–अगदीं

घरच्यासारखं वागायचं.—संकोच बिलकूल करायचा नाहीं. चला आतां स्नान उरका, जेवण तयार होतंय्. '

स्नान झाल्यावर दीनानाथशेटजी, श्रीधर आणि मी—आंतल्या खोलींत जेवायला बसलों.

श्रीधरची पत्नी सिंधू हीच आम्हांस वाढीत होती. दीनानाथांची मारखी बडबड चालली होती. श्रीधर मात्र खालीं मान घालून मुकाट्यानं घांसामागून घांस गिळीत होता. वाढतांना माझ्या पानाशीं सिंधू वांकली. अचानकपणें तिची माझी एक नजर झाली. एखाद्या खोल, अंधाऱ्या विहिरींत सहज डोकावून पहावें, आणि त्यांतील उदास भेसूरपणानें धक्का बसावा तसें मला झालें. कां कुणाला ठाऊक ? माझें सारं आंग शहारलें. मीं घेतलेल्या वासुंदीचा सुगंधी घोटही मला तोंडांत कडवट भासूं लागला. ताडकन पानावरून उठावें आणि बाहेर चालूं लागावें अशी भावना होऊं लागली. इकडचे पदार्थ तिकडे करून मी उठलों.

विडा घेऊन बाहेर येतांनाही दीनानाथांची टकळी चालली होती: ' हं ! जोशीसाहेब ! ही आमची गेस्टरूम—स्टोअररूम जी म्हणाल ती—पण अगदीं स्वतंत्र बरं का ! याच्या शेजारची रूम आमची. आमचा काय, एकटा जीव नि सदाशिव ! संन्याशाचा संसार ! शेजारच्या दोन खोल्या श्रीधर–सिंधूच्या. मी म्हटलं, कुठं तरी मुगभाटांत नाहीं तर कांदेवाडींत अंधाऱ्या खोलींत राहून रोज इतक्या लांब येण्यापेक्षां दोघांनीं इथंच रहावें. करतां काय ? अहो आमचा केमिस्टचा धंदा—

Open day and night.

[ रात्रंदिवस दुकान उघडें आहे, ]

अशी तांबड्या दिव्यानिशीं पाटीच असते दुकानावर. म्हणून म्हटलं श्रीधरला, रहा इकडेच अन् दुकानांतच निजत जा. रात्रीं अपरात्रीं येणाऱ्या गिऱ्हाइकांसाठीं रात्रपाळीचा निराळा नोकर ठेवायला नको. कां, खरं कीं नाहीं ? '

दुकानांत विडे सिगारेट झाल्यावर दीनानाथ शेटजींनीं साऱ्या औषध-कंपन्यांचे कॅटलॉग काढले.—बरोज् वेलकम्, बूटस्, पार्क डेविस्, अपजॉन्,

अॅबॉट, बेंगाल केमिकल्, अॅलेंबिक्, वगैरे अनेक कंपन्यांच्या औषधांचे डझन आणि ग्रोसचे भाव, बी. पी. प्रमाणें मिळणाऱ्या सुट्या औषधांचे पौंडावारी भाव, कॅस्टर ऑईल, कॉडलिव्हर ऑईल, मॅग्–सोडा–सल्फ्, व्हॅसलीन्-युकॅलिप्टस् ऑईल वगैरेंचे पिपांवारी ठोक भाव हीं सारीं प्रकरणें ते मला समजावून देत होते. यावरून त्यांच्या धंद्यांतील खोल माहितीबद्दल मला नवल वाटूं लागलें. जातांजातां धंद्यांतल्या कमिशन-कसर–जाहिरातीबद्दल कांहीं अनुभवाचे आडाखे त्यांनीं मला सांगितले. मला पक्की यादी करायला सांगून ते आपल्या खोलींत विश्रांतीसाठीं गेले. ‘ ग्लॅक्सो ’ आणि ‘ ओव्हलटाईन ’ च्या फोर्टमधील बड्या इंग्रजी प्रतिनिधींकडे माल आणण्यासाठीं श्रीधर निघून गेला. मुंबईत आलों आहोंच तर पत्नीसाठीं, मुलांसाठीं कांहीं खरेदी करून यावें असा विचार करून, प्रवासानें चुरकतलेले कपडे बदलून, शेटजींना सांगून मी बाहेर पडलों. कोपऱ्यावरील पानपट्टीवाल्याकडून सिगारेटचें पाकीट घेतों तों पैशाचें पाकीट दुसऱ्या कोटाच्या खिशांत राहिल्याचें लक्षांत येऊन मी परत निघालों.

ऐन दुपारची वेळ असल्यानें बाजार ‘थंडा’ होता. रिकाम्या दुकानांत काउन्टरशीं बसून एक नोकर पेंगत होता. आंतलें दार बंद होतें. म्हणून बाजूचें दार लोटून माझ्या खोलीकडे निघालों. तेवढ्यांत स्वयंपाकघराच्या बंद दाराजवळून जातांना मध्येंच खळकन् बांगड्या वाजल्याचा आवाज आला. आणि एक जोराचा हुंदका बाहेर ऐकूं आला. त्या मागोमागच ‘चूप’ म्हणून दीनानाथांचा घोगरा आवाज आल्यावर मी एकदम चपापलों. माझे पाय जमीनीवरून उचलेनात. आंतून सिंधूचा हताश आणि रडवा आवाज येत होता,-‘शुद्ध मांग आहांत, कसाई नुसते. किती छळून घेणार आहांत मला ! नाहीं रहावत आतां या नरकांत. एकदांची जीव देतें कुठेंतरी, म्हणजे तरी सुटेन तुमच्यासारख्या चांडाळाच्या हातून. ’

दीनानाथांचा आवाज आला,- “ वेडी कुठली ? असं काय करावं बरं ? त्या भिकारड्या श्रीधरसाठीं कां जीवाला लावून घेतेस इतकं ? अग,

तुझ्यासाठीं म्हणून मी त्याची इतकी गय केली आहे अजून. नाहीं तर एव्हांना बसला असता तुरुंगांत खडी फोडीत. पण तुला कुठं काय वाटलंय् त्याचं ? हं ! जगांत कृतज्ञताच उरली नाहीं बघ ! ”

सिंधूचा आवाज जरा चढला ती तुच्छतेनें म्हणाली,–“ कृतज्ञता ! किती उपकार मानायचे तुमचे ? अगदी मोलकरणीसारखी राबेन तुमच्या घरीं, तुमचे पैसे फिटेस्तवर–जन्मभर म्हणा;–पण असलं भलतंसलतं नाहीं मला खपत. त्यांच्या जीवाची काळजी नसती तर तुम्ही असे शब्द बोलल्याबरोबर मागेंच जीव दिला असता मी. ”

सारा प्रकार थट्टेवारी नेण्याचा प्रयत्न करीत दीनानाथ म्हणाले— “ अरे वा ! आमचा प्रेमळ ‘ सिंधू ’ आतां खवळायलाही लागला कीं ? छान ! अशिक्षित असूनही चुरुचुरू बोलायला तेवढं येतं नाहीं ! हें बघ, अशी चुकवाचुकवी करून भागायचं नाहीं.–अन् रोज तुझ्याशीं भांडायला मला वेळही नाहीं. बाहेर धंद्याच्या कटकटी अन् जरा आराम म्हणावा तर आंत तुझा हा प्रकार!–माणसानं कसं हंसूनखेळून, आनंदानं रहावं स्वतः अन् दुसऱ्यालाही तसंच ठेवावं–म्हणून तर मोकळं सोडलं तुम्हाला. पटत नसलं तर सरळ सांग उद्यांपर्यंत–श्रीधरला पोलीसच्या स्वाधीन करतों म्हणजे माझा संबंधच सुटला.–मग तर झालं ? मी जातों.–गप ! गप म्हणतोंना ! तोंड धू नीट, अन् नवी बांगडी घाल हातांत. ”

दीनानाथचे शेवटचे शब्द संपण्याआधींच मी शेजारच्या खोलींत गेलों. पैशाचें पाकीट घेऊन बाहेर पडलों. संतापानें माझीं कानशिलें तापून थाडथाड उडत होतीं. हात शिवशिवत होते. सरळ आंत जाऊन त्या नीचाच्या दोन थोबाडींत भडकाव्यात असें वाटलें; पण त्यानें फार तर माझा राग शांत झाला असता; पण श्रीधर-सिंधूच्या कपाळाचा नरकवास त्यानें कसा टळणार ?– हा सारा प्रकार आहे तरी काय ?

तासानंतर मी रिकाम्या हातानेंच परत आलों. दुकानाच्या वस्तूंची यादी करूं लागलों. श्रीधर जवळ बसून भाव सांगत होता. मी त्याला

हल्क्या स्वरांत सांगितलें, ' श्रीधर ! चौपाटीवर जरा जाऊं या आपण. मला बरंच बोलायचंय् तुझ्याबरोबर. '

त्याचा डोळा माझ्या डोळ्याशीं भिडला अन् खरकन् त्याचा चेहरा पडला. खालीं मान घालून तो कांपऱ्या आवाजानें म्हणाला, 'शेटजी नाहीं जाऊं देणार बाहेर संध्याकाळीं--केमिस्ट दुकानाची ही अगदीं वर्दळीची वेळ. बाहेर जाऊन कसं चालेल ? '

मी त्वेषानें म्हणालों--' श्रीधर ! माणूसच आहेस का तूं ? का अगदीं पशू बनलास इथं राहून ?'

त्याचे ओंठ थरथरूं लागले. तो म्हणाला,--' एवढंच शिल्लक होतं तर नशीबांत. तेंही होऊन जाऊं दे. तूं हो पुढं. चर्नीरोडच्या चौपाटी पुलाजवळ थांब. मी आलोंच मागून. एक वसुलीचा वायदा आहे म्हणून सांगतों शेटजींना.'

कशी तरी यादी करून मी उठलोंच. तेवढ्यांत दांत विचकीत, हंसत येणाऱ्या दीनानाथाकडे मला पहावेंसेंही वाटेना. ते म्हणत होते,-- ' कां, झाल्या कां याद्या जोशीसाहेब ? ठीक ! आतां तुम्ही मोकळे. धंद्याच्या गोष्टी विसरा आतां. मुंबईला आलां आहांत, जरा जिवाची मुंबई करा कीं ! आमच्याकडे खरी मौज रात्रींच असते. तुमच्यासारख्या पुणेकर भटजीला माहीत नसायचीच ती. आमचा एक गुजराती मुनीम, रणछोडलाल, यांतला दर्दी आहे. तुम्हाला घेऊन जाईल रात्रीं तुमच्या मर्जीप्रमाणं हवं तिकडे. आमच्या श्रीधरलाही घेऊन जा बरोबर. मीही आलों असतों; पण दुकानाचा रोजचा हिशेब लिहायचा असतो. त्यालाच बारावर एक वाजतो. रात्रीं उशीर होईल म्हणून संकोच करूं नका तुम्ही ! रात्रींबेरात्रीं औषधं देण्यासाठीं पुढच्या दाराला एक कायमची, भक्कम जाळीची खिडकीच आम्ही बसवून घेतली आहे. त्यांतून हांक मारा म्हणजे दार उघडीन मी. '

' बरं आहे.- चौपाटीवर जाऊन आठाच्या सुमाराला येतों मी. ' म्हणून मी बाहेर निघालों.

चौपाटीवर, गर्दीपासून दूर, एका जागीं बसून मी श्रीधरला प्रश्न केला. ' आतां लपंडाव नको. मी तुला इथं बोलावलं ते हिणविण्यासाठीं नव्हे. तुझ्या परिस्थितीची मला कल्पना आली आहे. ती कशी ओढवली त्यांतून कांहीं मार्ग निघतो कीं नाहीं याचाच विचार करायचा आहे आपल्याला. म्हणून म्हणतों आतां लपवालपवी नको. '

वाळूवर रेघोट्या ओढीत, जड आवाजांत श्रीधर सांगूं लागला :

" व्यापारांत शिरकाव करून घेण्याच्या उमेदीनं, कॉलेजचं शिक्षण अर्धंच सोडून मी दीनानाथांच्या दुकानांत नोकरी धरली.

धंद्याची खडान् खडा माहिती देऊन, पुढं मागं स्वतः क्रेडिटवर माल देऊन जवळपास स्वतंत्र दुकान काढून देण्याची आशाही त्यांनीं मला दाखविली होती. धंदा म्हटला म्हणजे दिवसाचे चोवीस तास त्याचाच ध्यास घेतला पाहिजे, ही व्यापारी यशाची गुरुकिल्ली सांगून माझा अन् सिंधूचा संसार त्यांनीं दुकानामागच्या दोन खोल्यांत थाटून दिला. रात्रंदिवस मी या केमिस्ट ड्रगिस्टच्या धंद्याचा अभ्यास करूं लागलों. मोठमोठ्या घाऊक औषधी व्यापाऱ्यांची, कारखानदारांची ओळख झाली.–धंद्यांतल्या खुब्या कळूं लागल्या—अगदीं आनंदांत काळ चालला होता माझा.

याच सुमाराला मला शेटजींनीं दाखविलेला गुजराथी मुनीम–रणछोडलालचा व माझा विशेष परिचय झाला. तो मला हिशेबाची, व्यवहार सौद्यांची माहिती देत असे. काय झालं अन् कसं झालं याचा मला अजून नीटसा उलगडा होत नाहीं,–मात्र एके दिवशीं बँकेंत भरणा करण्यासाठीं पेटींतले पैसे काढतांना त्यांतून एकदम एक हजार रुपयांची रक्कम नाहींशी झालेली दिसली. मी हिशेब पुनःपुन्हा चाळले, पण हजार रुपयांची तूट ! मी अगदीं घाबरलों. रणछोडचाही सल्ला घेतला. पैशाच्या पेटीची किल्ली माझ्याजवळ, कुलूप शाबूत. यामुळें मी चोरीचा बोभाटा केला तरी माझ्यावर कोणीही विश्वास ठेवणार नाहीं असं त्यानं मला सांगितलं. इकडून तिकडून कर्जाची व्यवस्था करून, किडूकमिडूक विकून महिना दोन महिन्यानें,

हिशेब तपासणीच्या वेळीं शिल्लक पुरी करीन असा मी विचार केला; पण एकाएकीं त्याच दिवशीं संध्याकाळीं दीनानाथ मला म्हणाले, -' अरे श्रीधर! बरेच दिवसांत हिशेब अन् शिल्लक तपासली नाहीं. काढ आज!' माझ्या छातीचे ठोके बंद झाल्यासारखं वाटूं लागलं मला. मी म्हटलं, ' शेटजी, हिशेब पुरे झाले नाहींत अजून. आठवड्यांत पुरे करून पुढें ठेवतों.

-' छे छे, त्यांत काय? पुरे झाले नसले तर आपण दोघेही एकत्र बसून पुरे करूं.' दीनानाथ म्हणाले.

पुढें सांगायचं काय कपाळ? हजार रुपयांची तूट स्पष्ट दिसत होतीच. शेटजींनीं रुद्रावतार धारण केला. फौजदारी फिर्याद दाखल करून दहा वर्षें सक्तमजुरीवर धाडण्याचा धाक त्यांनीं दाखविला. मी त्यालाही डरलों नसतों. पण सिंधू?—आम्ही दोघंही जगांत एकटीं अन् पोरकीं,-त्यांत ती अशिक्षित. कुठं जाईल, काय करील? कशी राहील? या विचारानें मी हतबुद्धच झालों.

रात्रीं जेवण झाल्यावर शेटजींनीं मला अन् सिंधूला बोलावून जवळ बसविलं आणि नरमाईची भाषा सुरू केली. आपल्या मनाप्रमाणं वागून, पुढं अगदीं नीट, सरळ, गडबड न करतां रहाण्याचं आम्हीं दोघांनीं कबूल केलं तर झाली गोष्ट विसरण्याची तयारी त्यांनीं दाखविली; नाहींपेक्षां दोघांचे काय धिंडवडे निघतील याचंही भेसूर चित्र रेखाटलं. पुढं काय, जें व्हायचं तेंच झालं.

रात्रीं अकरा वाजतां मी दुकान बंद करीत होतों. सिंधू आमच्या आंतल्या खोलींत अंथरुणं घालीत होती.

दीनानाथांनीं त्या खोलींत जाऊन आंतून दार लावून घेतलं.

त्या दिवसापासून सिंधूच्या तोंडावर कधीं हंसू दिसलं नाहीं. अन् माझा अवतार तर तूं पहातोसच. अशा परिस्थितीत यंव करावं न् त्यंव करावं असं करायला हवं होतं. म्हणून मोठमोठे उपदेश करणं सोपं आहे. पण माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या आवाक्यांतला उपाय सांपडणं

कठीणच. माझ्या डोळयापुढं अंधार आहे. एखाद्या दिवशीं सिंधू आपल्या जीवाचं बरं वाईट करून घेईल अन् मलाही तोच मार्ग अनुसरावा लागेल हें स्पष्ट दिसतंय् मला.'

गळा दाटून येऊन श्रीधर स्वस्थ बसला.

दीनानाथांबद्दलची माहिती मी त्याच्याकडून काढून घेतली. चार वर्षांपूर्वीच त्यांची पत्नी वारली होती. घरोब्याचे आप्तसंबंधीं त्यांच्या ओळखीचे कोणी नव्हते. अलीकडे मात्र गिरगांवांतल्या गायवाडींत रहात असलेल्या पिरोजबाई या श्रीमंत तरुण विधवेकडे त्यांचे जागेंयेगें चालू होतें. श्रीधरकडून त्यांचीं नेहमीं पत्रें निरोप जात. तिच्याशीं पुनर्विवाह करण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता.

मी श्रीधरला म्हणालों,—' बरंय्, जा तूं. मी इथंच पडतों वाळूंत जरा वेळ.–मागून येईन मी.'

या परिस्थितींत मी तरी काय करूं शकणार ?

पायींच परत निघालों असतां गिरगांव पोर्तुगीज चर्च, मॅजेस्टिक सिनेमा वगैरे भाग टाकून मी गायवाडीवरून चाललों आणि श्रीधरनें सांगितलेल्या माहितीची आठवण झाली. असल्या नाजूक बाबतींत पिरोजबाई-सारख्या अनोळखी परक्या बाईची तरी काय मदत होणार ? तरीही एकदां तिला भेटून जावेंच असें वाटूं लागलें.

त्यांचा पत्ता काढून मी दारांत गेल्याबरोबर मला जरा आश्चर्यच वाटलें. दोन महिन्यापूर्वीं पुण्याला, आमच्या शेजारच्या ब्लॉकमध्यें एक प्रभु बाई येऊन हवापालटासाठीं महिनाभर राहून गेली, एवढें मला माहीत होतें. मी तिला वारंवार पाहिली; परंतु नांवगांव माहिती वगैरे संभाषण करण्याचा प्रसंग आला नव्हता. त्यांनीं मात्र मला आतांही चटकन् ओळखलें. प्रभू स्त्रियांच्या मोकळ्या दिलदार स्वभावानें माझें स्वागत करून त्यांनीं विचारलें, 'कोण, पुण्याचे जोशी का ?--कां, आज पुणेकर मंडळीची आमच्या मुंबईवर स्वारी कां झाली बाई ?' मी म्हटलें, 'पिरोजबाई ! मी आलों होतों इकडे

धंद्याच्या कामासाठीं; पण आतां अडकून बसलोंय् एका धर्मसंकटांत. थोडा वेळ आहे कां तुम्हाला ? ”

‘ हात्तीच्या ! वेळाचं काय मेलं.—या कीं आंत. ’ म्हणून त्यांनीं पुढच्या खोलींत मला बसायला सांगितलें. आंत आचाऱ्याला कॉफी आणायला सांगून त्या समोरच्या खुर्चीवर बसल्या आणि म्हणाल्या,—‘ बोला. ’

  

मी परत निघालों तेव्हां नऊ वाजले होते. पिरोजबाईच्या मदतीच्या आश्वासनामुळें मला आतां कांहीं आशा वाटूं लागली होती. दीनानाथांकडे जेवण आटपून मी बाहेर येतों तों विड्याच्या पिचकाऱ्या मारीत रणछोडलाल मुनीम माझ्याजवळ येऊन, बसून, कुठं कुठं जायचं, काय काय मौज करायची म्हणून हंसत विचारूं लागला. माझें डोकें दुखत असल्याचें कारण सांगून मी त्याला परत पाठविलें.

रात्रीं मी आणि श्रीधर दुकानांत झोंपलों. पिरोजबाईच्या भेटीची सविस्तर हकीकत मी त्याला सांगितली. पाणी पिण्याच्या निमित्तानें मीच त्याला सिंधूच्या खोलींत तिला सर्व माहिती देऊन येण्यास पाठविलें. जातांना मी सांगितलें. **“ जगांत वागायचं असलं तर इतकं हळवं राहून भागत नाहीं बाबा ! सात्विकतेला देखील कांहीं सीमा असावी लागते. चांगल्याशीं चांगलं रहावं हें जितकं खरं आहे, तितकंच हेंही खरं कीं, हलकटाशीं हलकट, आणि बेशरमाशीं प्रसंग पडल्यास आपणही बेशरम झाल्याशिवाय उपाय नाहीं. ”**

तासभरानें तो परत येऊन माझ्या शेजारच्या अंथरुणावर येऊन पडला. झोंपी जाण्यापूर्वीं त्यानें अगदीं कृतज्ञतेनें, आदरानें माझा हात दोन्ही हातांत धरून दाबला. अंधारांत त्यावर दोन अश्रू पडले.

  

सकाळीं आम्हीं उठून चहासाठी आंत जातों तों सारा नूर एकदम बदललेला. कालची रडवी सिंधू आतां अगदीं ओळखूं न येण्याइतकी बदल-

लेली दिसली. उघड्या गळ्याचा ब्लाउज, तलम रेशमी पातळ, आणि हंसरा, पावडर लावलेला तिचा चेहरा पाहून दीनानाथांना आपली कालची मात्रा लागू पडली असेंच वाटलें असावें. तिच्या आकर्षक वेष व चेहऱ्याकडे पाहतां पाहतां आम्ही दोघें जवळ आहोंत याचीही जाणीव ते विसरत असल्यासारखें दिसूं लागले. शेवटीं न राहून ते दांत विचकीत म्हणालेच,–"वा ! हें ठीक ! सिंधू,–तरी मी किती दिवस म्हणत होतोंच कीं, गबाळपणा अगदीं आवडत नाहीं मला. जरा मुंबईत असल्यासारखं रहावं–आतां रहाणार ना नेहमीं असंच ?" असा प्रश्न टाकून त्यांनीं तिच्याकडे एक अर्थपूर्ण कटाक्ष फेंकला.

सिंधूनें आमचे चहाचे दोन कप बाहेर दुकानांत आणून ठेवले. ती आंत जातांच बेहोष झालेल्या दीनानाथानें न रहावून पटकन् दार लोटून घेतलें. आम्ही चहाचा कप तोंडाला लावला तेवढ्यांत दुकानांतला बाळू आंतल्या खोलीशीं जाऊन दार ठोठावूं लागला. 'शेटजी ! भायर कोन बाय् आल्यात बगींतना–तुम्हांला पुसतांय् !' त्याचें वाक्य पुरें व्हायच्या आंत ती बाई आंत येऊन उंबरठ्याशीं उभी राहिली. दीनानाथांनीं दार उघडलें आणि आश्चर्यानें उद्गार काढला, "कोण–पिरोज ?- तूं इथं ?"

"कां ? मी यायला नको होतं इथं आत्तां असंच ना ?" पिरोजबाई खोंचकपणें म्हणाल्या.

कातरलेली सुपारी हातांत घेऊन दीनानाथांपुढं करीत सिंधू त्यांना लागूनच उभी होती. तिच्याकडे रागानें वळून पिरोजबाई कडाडल्या, ही कोण सटवी ? तुम्हांला खेटून हक्कानं उभी आहे ती ? –चांगलं केलंत बरं कां ! इतके दिवस हे तुमचे गुण छपवूनच ठेवले होते म्हणायचे. आज सहज कांहीं औषधांची, टॉयलेट सामानाची खरेदी करावी अन् तुमचं दुकानही नीट बघावं म्हणून आलें, अन् बघतें तर तुमचे हे चाळे चाललेत."

" चेहऱ्यावरचा घाम पुशीत, गडबडीनें दिनानाथ अडखळत म्हणाले,–" अग, हें काय पिरोज ? अगदीं गैरसमज होतोय् तुझा. अग, ही माझ्या कारकुनाची बायको,—ही मला बहिणी सारखी ! "

" अस्सं ! पण मी कांहीं बोंडल्यानं दूध नाहीं पीत म्हटलं ? एकूण मी तुमच्याशीं लग्न करावं, अन् ही मेली छचोर, वेसवेसारखा थाटमाट केलेली बाई सवतीसारखी उरावर आणून नाचवावी घरांत, असंच ना ? बरे लवकर डोळे उघडले. "

अगदीं त्रासून दिनानाथ म्हणाले, " भारी संशयी बायका तुम्ही बुवा ! या भिकारडीचा का तुला मत्सर वाटायला लागला ? हवं तर या क्षणाला हांकून देतों हिला. "

मग जरा समाधान वाटल्यासारखें पिरोजबाईच्या चेहऱ्यावर दिसलें. खुर्चीवर बसून तोंडावरून रुमाल फिरवीत त्या म्हणाल्या,—

" इतकं निक्षून सांगत असलांत तर मग ठीक आहे. माझा आपला असा स्वभाव आहे.—कसला संशय खपत नाहीं मला. आधींच बघा पटलं तर,—नाही तर आपले दोघांचे रस्ते निराळे. मी समजेन कीं तुम्हांला मी नको अन् माझ्या पन्नास हजारांच्या इस्टेटीवरच तुमचं लक्ष होतं. "

" छे-छे–छे ! भलतंच काय बोलतेस ?" दीनानाथ घाबरून म्हणाले ..." तुझ्यापुढं काय एक कारकुंडा अन् त्याची बायको मला जास्त आहे ? बघ या क्षणाला—"

" श्रीधर !" दीनानाथांची घोगरी हांक बाहेर घुमली. मी त्याला आंत लोटलें आणि दारांत येऊन उभा राहिलों.

आपल्या खरखरीत आवाजांत नरमाई आणण्याचा प्रयत्न करीत दीनानाथ म्हणाले, " हें पहा श्रीधर ! इतकीं वर्षं धंदा शिकवायला मी तुला जवळ ठेवलं,–माझ्या घरांत तुझा संसार थाटून दिला. चुकांवर पांघरूण घातलं–दोघांत कडवटपणा येण्यापूर्वीच आपण गोडीगुलाबीनं मोकळं व्हावं हें बरं नाहीं का ?"

"छे छे! असं कसं होईल शेटजी?" श्रीधर उत्तरला. "माझ्या-कडून दुकानाला एक हजार रुपये येणं आहे तें फिटून आपली परवानगी मिळेपर्यंत मी जर निघून गेलों तर या उचापती बद्दल माझ्यावर फौजदारी फिर्याद लावावी असं आपण लिहून घेतलंय माझ्याकडून..."

पिरोजबाई रागानें पाय आपटून म्हणाल्या, "चांगला सिद्धसाधक-पणा चाललाय् बरं का! मेला कारकून तो काय, अन् हजार रुपड्यांची बाबत ती काय—त्यासाठीं त्याच्याकडून वदवून घेतां, कळतंय् मलं सारं! मी ही चाललें. बरं झालं. मोह तुटला संसाराचा. कालच त्या हिंदू हायस्कुलाचे सुप्रिटेन् येऊन भेटून गेले. पंचवीस हजार दिले तर "पिरोजबाई हायस्कूल" म्हणून शाळेला नांव द्यायचं, अन् गवर्नराच्या हातानं चांदीच्या नळकांड्यांतून मानपत्र देववायचं कबूल केलंय् त्यांनीं. त्या उमरखाडीच्या आणि माटुंग्याच्या अनाथाश्रमांना दहा दहा हजार, अन् म्हसकरांच्या प्रसूतिगृहाला पांच हजार देऊन टाकायचा विचार आहे माझा. मेलं नांव तरी राहील."

एकेका रकमेचा आंकडा ऐकतांऐकतां दीनानाथांच्या बटबटीत डोळ्यां-तलें उत्सुकतेचें तेज रति-रति वाढत होतें. बेफिकीरी दाखवीत ते म्हणाले,— 'अंऽ, त्यांत काय! अग, मीही कैक हजारांच्या देणग्या दिल्यात; पण त्या गुप्तदान म्हणून. जाऊं दे. या एका हजाराचं निमित्त सांगून मी या दोघांना आपल्या वाटेंत नाहीं आडवं येऊं देणार. मग तर झालं? हे बघ, तुझ्या समोर तिकीट लावून ही पावती देतों अन् राजीखुषीनें नोकरींतून मुक्त केल्याचं लिहून देतों. मग झालं? मात्र यांच्याच साक्षीनं आपल्या लग्नाचा मुहूर्त तूं ठरवून सांगितला पाहिजेस बघ."

हाताच्या टप्प्यांत आलेली पन्नास हजारांची इस्टेट श्रीधर–सिंधूमुळें जाते हे दिसतांच त्यांना खड्यासारखें उचलून फेंकून देण्याची दीनानाथांची तयारी होती. पावती आणि फारकतपत्र श्रीधरच्या अंगावर टाकून दीना-नाथांनीं विजयी मुद्रेनें पिरोजबाईकडे पाहिलें.

त्यांनींही मान खालीं घातली;—पण ती लज्जेमुळें कीं दुसऱ्याच कांहीं भावनेनें कुणाला ठाऊक !

+ + +

मी मुंबईला गेलों तो एकटाच. परंतु पुण्याला परत जातांना मात्र श्रीधर आणि सिंधू हीं माझ्याबरोबर होतीं. माझ्या नव्या दुकानांत मदतनीस म्हणून मी त्याला घेऊन निघाल्यापासून, तीनचार तासांतच श्रीधरचा 'काया-कल्प' झाल्यासारखा दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरील दुखवट्यासारखा उदास, रडवेपणाचा छाप निघून, आतां मधूनमधून तो हंसण्याचाही पराक्रम करून दाखवूं लागला. नेहमीं आरामांत असलेल्या जीवाला आकस्मिक आनंदाची कल्पना येणें कठीण ! दुःखाच्या खाईंतून भाजून, होरपळून, कसें-तरी धडपडत बाहेर पडलेल्या जीवालाच निर्वेधपणाचा, सुटकेचा, खरा आनंद अनुभवतां येतो. श्रीधर आणि सिंधू यांची स्थिति अशीच होती.

× × ×

दिवाळीच्या मुहूर्तावर सुरू केलेल्या औषधाच्या दुकानांत मी कॅशमेमो फाडीत गिऱ्हाइकांचे पैसे मोजीत बसलों होतों. नवीन आलेला माल कपाटांत रचीत, बाटल्यांवर सांकेतिक लिपींत किंमतीचीं अक्षरें घालीत श्रीधर जवळच उभा होता. गिऱ्हाइकें गेल्यावर आळस देऊन मी जरा हंसून त्याच्या उत्साही तजेलदार चेहऱ्याकडे पाहिलें. त्याबरोबर कसलीशी आठवण होऊन त्यानें कोटांतून मुंबईच्या एका दैनिकाचा अंक काढून माझ्यापुढें केला. एका कॉलमवर त्यानें तांबडी खूण केली होती. तो मजकूर असा:—

### गिरगांवांत खळबळ

मुंबई ता. १५ ऑक्टो.—गायवाडींत रहाणाऱ्या श्रीमती पिरोज **कर या श्रीमंत, कुलीन स्त्रीच्या घरांत शिरुन, शिवीगाळी करुन, त्यांच्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल श्री. दीनानाथ या प्रसिद्ध केमिस्ट व ड्रगिस्ट दुकानदाराला काल गिरगांव पोलिसांनीं अटक केली. सदर बाई पिरोजबाई यांनीं दिलेलें लग्नाचें वचन

नाकारल्यामुळें चिडून आरोपीनें हा हल्ला केला असें कळतें. पहिल्या गुन्ह्याचा फायदा देऊन एक हजाराच्या चांगल्या वर्तणुकीच्या जामिनावर श्री. दीनानाथ यांची मॅजिस्ट्रेटनें सुटका केली. स्थानिक दवाबाजारांत या बातमीनें बरीच खळबळ उडाली आहे.

यावर श्रीधर कांहीं कृतज्ञतेचे शब्द बोलणार असें वाटून मी संकोचानें मान फिरविली.

दुकानामागील ब्लॉकमध्यें आमची दोघांची वाट पहात, भाऊबीजेच्या ओवाळणीसाठीं सिंधू तबकांत नीरांजन ठेवीत होती. त्याचा मंद शांत प्रकाश तिच्या चेहऱ्यावर खेळत होता.

—सत्यकथा, दिवाळी अंक १९४१

## एक संसार (४)

"येतें ग आई!"

यमूनें पांचव्या वेळीं म्हटलें. गळ्याशीं आलेला हुंदका दाबून, मागें वळून डोळ्यांना पदर लावला. भरल्या डोळ्यानें, तिच्या आईनें तिचे डोळे पुसले.

"उगी बाळ! सासरीं जातांना रडूं नये असं. अग, हल्लींच्या मुली तर हंसत, उतावीळ होऊन सासरीं जातात म्हणे, अन् तूं काय करतीस असं! आपल्या 'खेड'ची रहाणारी अन् खरीच खेडवळ असं म्हणतील जांवई-बापू! उगी."

"चिमण्या गणपती"च्या देवळापर्यंत येऊन तिनें यमूला कुंकू लावलें. हंडा, कळशी घेऊन जवळून जाणाऱ्या कुणबाऊ बाईलाही कुंकवाचा टिळा लावून तेंच बोट आपल्या कपाळाला लावीत ती मागें वळली. पुढें चाल-णाऱ्या जांवईबापूंनीं बीजवराच्या आतुरतेनें मागें एक कटाक्ष टाकून लवकर पुढें चलण्यासाठीं चुटकी वाजविली. गांववेशीबाहेर पडण्याच्या सुमाराला एका पडक्या घराच्या दरवाजांतून एक रडका आवाज आला. यमूचे पायही तिथेंच जरा थांबले होते.—

—"यमू! यमने!! नाहीं ना विसरणार मग? तुझ्या शनवारांतच होतं आमचं घर, तिथंच लागेल इकडचा तपास. तुझ्या कुंकवाची शपथ आहे बघ! नीट तपास काढून समजूत करीव त्यांची. कातड्याचे जोडे करून पायांत घालीन तुझ्या.

कोणाचा तरी बोलण्याचा आवाज ऐकून मुकुंदरावांनीं एक त्रासिक नजर मागें फेकली. एक फिकट अगदीं कृश, तरुण मुलगी मागें फिरून, अर्ध-पडक्या घराच्या दारांतून आंत निघून गेली.

× × ×

'खेड'च्या गांववेशीपलीकडील ओढ्याकांठचा मोटारस्टँड माणसांनीं गजबजला होता. एजंट ड्रायव्हरांचीं हंसणीं खिदळणीं, हमाल, हॉटेलवाले, फेरीवाले यांची आरडाओरड, उतारूंची धांदल-या सर्व देखाव्यावर (गॅस) मोटारींचा धूर पसरलेला होता. बऱ्याच वेळानें पुण्याकडे जाणाऱ्या एका मोटारीच्या कंपार्टमेंट-भागांत यमूला आणि जावईबापूंना जागा मिळाली. यमू अंग चोरून, खालीं मान घालून बसली होती. तिचे पतिराज मात्र विडा चघळीत, मधून मधून मोटारच्या आंतल्या भागाकडे नजर टाकीत, वर्तमानपत्र चाळीत होते.

'भीमे'च्या उंच दरडीवरील पूल ओलांडून, त्यांची मोटार चाकणच्या रस्त्याला लागली. डोक्यावरून घेतलेला पदर दातांत धरून मधूनच डोळ्याच्या कोंपऱ्यांतून ओघळणारा थेंब पुशीत, दृष्टीआड सरत जाणाऱ्या खेडच्या चिरेबंदी नदीघांटाकडे, आणि मेंढे-कोटांसारख्या तट-दार मातीच्या घरांकडे पहात यमू मूकपणें बसली होती.

मुकुंदराव जरा तिच्या जवळ सरले. वृत्तपत्राआडून तिच्या हातावर त्यांनीं हात ठेवला. तिला विचारलें—

—"अजून रडतेस? आईची आठवण होतेय्?" यमूनें न बोलतां डोकें हलविलें. पुन्हां मूकता.

मुकुंदरावांनीं जरा त्रासाचा 'चक्' असा आवाज करून पुन्हां वृत्तपत्र उघडलें; तें चाकण येईपर्यंत. तेथील विहिरीजवळच्या स्टँडवर मोटार थांबली. संत्री, मोसंबीवाल्यांचा गराडा मोटारभोंवतीं पडला. पांच मिनिटांनीं मोटार पुढें निघाली. सारे उतारू लवून चाकणच्या जुन्या किल्ल्याकडे पहात होते.

एक संत्रें सोलून त्याच्या फोडी मुकुंदरावांनीं यमूच्या हातावर ठेवल्या. ते हळूच म्हणाले—"अगदीं मुक्याचं व्रत घेतलंय् वाटतं? तसं असलं तर हें वर्तमानपत्र तरी वाचा, त्यानं तरी मनाची जास्त करमणूक होईल..."

आधल्या रात्रभर जागून, अंथरुणावर पडल्या पडल्या आईनें दिलेली किती तरी माहिती, नवी शिकवण आतां यमूला आठवूं लागली. तिनें बळेंच ओंठावर हंसूं आणलें—आणि 'इश्श !' एवढा पहिला शब्द काढला.

तेवढ्यावरच मुकुंदराव खूप झाले. एक सिगारेट शिलगावून त्यांनीं प्रश्न केला—"बरं, काय ग ? आपण येतांना रस्त्यांत भेटली ती पोरगी कोण होती ?"

परिचित आणि मनांत घोळणारा विषय निघाल्यानें भीड चेपून यमू जरा मोकळेपणानें म्हणाली—"माझी लहानपणापासूनची मैत्रीण आहे ती.—गंगू तिचं नांव. पुण्यालाच दिली होती तिला, पण तीन वर्षं झालीं, नवऱ्यानं टाकलीय् तिला. बापडी झुरून झुरून, अश्शी झालीय्—कोण मेला कृष्णराव नांवाचा माणूस आहे म्हणे. पुण्याला गेल्यावर त्याचा तलास लावून त्याचं मन वळवावं म्हणून बापडी विनवीत होती मला—खरंच, सांपडेल कां हो तो आपल्याला ?"

—"हँ ! अग खुळे ! अग नेमका एक माणूस शोधून काढायचा साऱ्या पुण्यांतून—काय सोपं काम आहे हें ? असले शंभर एक नांवाचे गृहस्थ सांपडतील एक आपल्या आळींतच ! हें काय 'खेड' लागून गेलंय्, कीं एकदां 'ब्राह्मण आळींतनं 'चंडीराम बुवाच्या घाटा' पर्यंत चक्कर मारली कीं हवा तो माणूस खुशाल निवडून काढावा म्हणून ? बरं तें मरूं दे—आधीं तुझं पहिलं काम म्हणजे या कोंपराइतक्या बाह्यांच्या पोलक्यांऐवजीं नव्या तऱ्हेचे ब्लाऊज शिवायला टाकायचे, अन् या वेणफटाऐवजीं चांगली रिबन लावून शेपटा सोडायचा. ध्यानांत ठेव. अन् असं घुम्यासारखं नाहीं वागायचं—कसं हंसून खेळून रहायला हवं माणसानं......"

× × ×

यमुनेनें नव्या घरीं प्रवेश केला. पहिल्या संसाराचीं, माळ्यावर गंजत पडलेलीं भांडीकुंडीं घांसून, नीट लावून ठेवलीं. संध्याकाळीं बाहेरच्या बैठकीच्या खोलींतून हांक आली—"दोन कप चहा ठेवा, अन् झाला

म्हणजे घेऊन या बाहेर. " त्यामागून ' ह्यः–ह्यः–ह्य....!' असा कोणा परक्या मनुष्याचा हंसण्याचा आवाज आला. थोड्या वेळानें यमू ताटांत कपबशा घेऊन बाहेर आली. ताट खालीं ठेवून परत वळली. मुकुंदरावांचा रागाचा हुकूम आला—" हं ! असं जायचं नाहीं उमटपणं. हे दाजीसाहेब! माझ्या भावासारखे—भावाहून अधिक. भाऊजी म्हणायचं यांना. नमस्कार कर नीट. "

यमूनें त्यांना वांकून नमस्कार केला. क्षणमात्र त्यांचा चेहरा तिला दिसला–ताठ उभे असलेले पांढरट केंस, भोंवतीं काळीं वर्तुळें पडलेले निस्तेज डोळे, वास्र्यांसारखे खोल गेलेले गाल–विड्यानें रंगलेल्या ओठांतून बाहेर डोकावणारे विद्रूप दांत......असा चेहरा पाहिल्याबरोबर यमूचें सारें अंग शहारलें. ती आंत जातांना त्यांचा दबलेला आवाज तिला ऐकूं आला.

– " अस्मादिकाचं ऐकून टेव मुकुंद ! पुन्हां आपण होऊन ही बेडी अडकावून घेतलीस तूं. पहिल्या नव्हाळींत बरं वाटेल जरा, पुढं कंटाळ-शील, त्रासशील अन् माझंच म्हणणं खरं मानशील—अरे, मोकळ्या रानांत, मिळेल त्या सुखाचा चारा चरणारं जिणं कुठें, अन् या घरच्या गव्हाणींतील शिळी पेंड खाणाऱ्याचं जिणं कुठें ?.....

त्यानंतर सहा महिने ( नव्या स्वप्नासारखे ) गेले. शिसारी–संकोच–सह्यता–अर्धे सुख, अर्धी दुःख संवेदना–या पायऱ्यांपायऱ्यांवरून यमूला संसारांतल्या नव्या नव्या अनुभवांची ओळख होत होती. या सहा महिन्यांत मुकुंदरावांनीं सारा फावला वेळ घरांतच काढला. यमू अगदीं रडकुंडीला येईपर्यंत, वेळीं अवेळीं त्यांच्या आधाशी शृंगाराचे निर्दय प्रयोग चालत–ते येथवर कीं यमूला आपल्या देहाचाही अगदीं तिरस्कार वाटूं लागला. या पाशवी प्रणयाच्या अतिरेकानें तिच्या मनांत हळूं हळूं फुटत चाललेले प्रेमाचे अंकुरही चिरडून गेले. तिनें मुकुंदरावांची धास्तीच घेतली–ती दिवसें-दिवस उदास, निरुत्साही दिसूं लागली आणि त्याबरोबर मुकुंदरावांच्या लाडीगोडी-खालीं ( लपलेली ) स्वार्थी कठोरताही वर डोकें काढूं लागली.

अशांतच तिचे दिवस गेले. सतत ओकाऱ्या. पोटांत अन्न ठरेना. सारें घर सतत गरगरा फिरत असल्यासारखें तिला होई. तरी उठत बसत, सैपाक, चहा-पाणी झाड-लोट करून ती मुकुंदरावांना कांहीं कमी पडूं देत नसे. पण एवढ्यावर त्यांची भूक मागत नव्हती ते अधिकाधिक चिडखोर अन् तापट दिसूं लागले-आणि त्यांचा पायही घरांत ठरेना.

दर महिन्याला खेडहून तिला गंगूचें पत्र येई. त्यांत तिच्या संसाराच्या सुखाचीं अपेक्षित, काल्पनिक चित्रें रेखाटून ती स्वतःच्या स्थितीचें रडवें वर्णन करी. पतीच्या शोधाचें काम कितपत झालें, असें खोदून खोदून प्रश्न विचारी. दोघींपैकीं अधिक दुःखी कोण याचा यमूला संदेह पडूनही, आपल्या अधिक दुःखी संसार-सौख्याचीं तीं काल्पनिक वर्णनें लिही.

एके रात्रीं बारा वाजतां यमू खुर्चीवर पेंगत असतां खडबडून जागी झाली. दारावर थापा पडत होत्या. तिनें उठून हांक मारली–'कोण आहे?'

— "मी दाजीबा! मुकुंदरावांना जग बरं वाटत नाहीं, घरीं घेऊन आलोंय् त्यांना." दाराजवळून टांगा गेल्याचा आवाज झाला. यमूनें दार उघडलें.

बेहोष झालेल्या मुकुंदरावांना ओढीत दाजीबानें आंत आणलें आणि वळकटीशीं लोटून दिलें.

— "का—काय झालं यांना?" त्यांच्या उशाशीं बसून यमूनें घाबरून विचारलें. जवळच्या खुर्चीवर हातपाय ताणून बसून, सिगारेट शिलगावीत दाजीबा उत्तरला—"काय व्हायचंय्? पचवायची ताकद नाहींन् आख्खी बाटली झोंकायला हवी याला–पडला भर मैफलींत उताणा, म्हणून घेऊन आलों त्याला टांग्यांतून. हा मुक्या असाच हिला. पडूं द्या असाच सकाळपर्यंत, येईल आपोआप भानावर–अन् मीही इथेंच पडेन म्हणतों."

यमू कठोर आवाज उत्तरली—"कांहीं नको. मी करतें सारी शुश्रूषा—तुम्ही नका तसदी घेऊं–जा तुम्ही!"

तिच्या नजरेला नजर देण्याची दाजीबाचीही हिंमत झाली नाहीं. तरी आपले ओंगळ दांत बाहेर काढीत ते म्हणाले—"एः-फारच परक्यासारखं

करतां तुम्ही वहिनी ! ठीक आहे, एवढ्यांत नाहीं पटायचं, आणखी डोळे उघडायला हवेत तुमचे. अहो, हा मुक्या...''

—'आतां उठतां कीं नाहीं इथून?' यमू ओरडली–दाजीबा नाखुषीनेंच तिथून उठले–जातांना मात्र म्हणाले–

"ठीक आहे, आतां जातों, पण उद्यां दिसेल, या घरावर कुणाची सत्ता आहे–तुमची कीं माझी"—

अन् झालंही असंच. मुकुंदरावांच्या संमतीनें दाजीबांचा मुक्काम रात्रंदिवस त्यांच्या घरींच पडूं लागला आंतल्या खोलींतल्या कोंपऱ्यांत बाटल्यांची रास वाढूं लागली—एक एक करून यमूचे दागिनेही बाजारची वाट चालूं लागले. मुकुंदरावांच्या नोकरीच्या कामांत साहजिकपणें हयगय होत गेली... जोराचा शेवटचा ठपका ठेवून, पुन्हां कांहीं चुकारपणा दिसल्यास बडतर्फ करण्यात येईल असे त्यांना सांगण्यांत आलें. त्यावर दाजीबाची मखलाशी होतीच-" अरे लेका ! नोकरी काय घेऊन बसलास? चल माझ्या बरोबर ! एक सोडून छप्पन नोकऱ्या लावून देईन तुला. पण इथंच, बायकोच्या पदराला गांठ मारलीय् ना तुझ्या ! असाच मरायचा तूं मालकाचे जोडे अन् बायकोचीं बोलणीं खाऊन !"

त्यावर खोलीला कड्या लावून रात्रीं बारावर दोन वाजेपर्यंत त्यांचीं हलक्या आवाजांत खलबतें चाललीं होतीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा घेतांना मुकुंदराव आस्था दाखवीत म्हणाले—" किती वाळलीस ग तूं? रोज पाहिल्यानं माणसाचं लक्ष जात नाहीं, पण आज एकदम फरक वाटला खरा. तुझी तब्येत अशी, त्यांतून दिवस गेलेले; अन् वर सैंपाकपाण्याचा बोजा...हें बघ असं करीनास? आठ पंधरा दिवस जाऊन ये माहेरीं 'खेड'ला. तेवढाच विसांवा मिळेल तुला. 'भीमे'चं निर्मळ पाणी, संत्रीं, मोसंबी, कसदार कांदे, बटाटे रेलचेल नुसती. हां हां म्हणतां खडखडीत बरी अन् टुकटुकित होशील. अन् आईचा आग्रह असलाच तर बाळंतपण आटपल्यावर आलीस तरी आपली हरकत नाहीं.

नाहीं तरी डबे खायची संवय आहेच आम्हांला—बघ, रजा घेतों दोन दिवसांची. दुपारच्या मोटारनं निघूं या. कां?"

या अनपेक्षित मायेंत कांहींतरी मायावीपणा आहे हें यमूलाही कळून आलं. पण तें न दाखवितां ती म्हणाली—" कांहीं नको. माझे हातपाय हाल-ताहेत तोंवर आपली नाही गैरसोय होऊं द्यायची मी. जें व्हायचं असेल तें इथंच, सत्तेच्या घरीं होऊन जाऊंदेत."

पण या एकनिष्ठपणामुळें मुकुंदरावांना बरें वाटण्याऐवजीं राग मात्र आला. कांहीं न बोलतां, चरफडत ते आपल्या खोलींत गेले.

+ + +

हा सारा शनिवार सकाळचा प्रकार. संध्याकाळीं घरी येऊन मुकुंदराव आंतल्या खोलींत चोर पावलांनीं केव्हां गेले तेंही यमूला कळलें नाहीं. तिनें आंतलें दार उघडलें तेव्हां ते एकदम दचकलेले दिसले. त्यांचा घाबरलेला घामाघूम चेहरा अगदीं न ओळखण्याइतका बदलला होता. ओठावरून जीभ फिरवीत, हलक्या आवाजांत ते म्हणाले—" दाजीबाखेरीज कोणीही भेटायला आलं तर मी घरीं नाहीं म्हणून सांग. दाजीबा आल्याबरोबर मात्र त्यांना आंत पाठवून दे."

हा प्रकार काय आहे हें यमूला कळेना.

त्या रात्रीं मुकुंदरावांनीं भरलेलं ताट बाजूला लोटून दिलं. उघड्या डोळयांनीं, तळमळत, येरझारा घालीत सारी रात्र काढली. दोनतीनदां आंतल्या खोलीं-तल्या कपाटाची भेट घेऊनही त्यांना शांति लाभली नाहीं. रविवारचा सारा दिवस त्यांची सारखी आंतबाहेर कोणाची तरी प्रतीक्षा चालली होती. शेवटीं रात्रीं जरा अंधारल्यावर कधीं न घातलेला एक रुमाल डोक्याला गुंडाळून, त्याच्या कडा डोळ्यापर्यंत ओढून ते बाहेर जाऊन आले.

पण आले ते पूर्वीपेक्षांही अधिक बेचैन स्थितींत—रात्रभर ते माशा-सारखे तळमळत होते. त्यांचें डोकें मांडीवर घेऊन, कपाळाला बाम चोळीत यमू किती तरी वेळ अवघडून बसली होती. अनेक तऱ्हांनीं तिनें मुकुंद-

रावांच्या या बेचैनीचें कारण विचारून पाहिलें—माहीत होत्या तितक्या शपथा घातल्या, पण त्यांच्याकडून सरळ उत्तर मिळेना—शेवटीं मात्र रागानें त्यांनीं फडाफड आपल्याच तोंडांत मारून घेतल्या आणि हातांत तोंड लपवून हताशपणें रडण्यास सुरवात केली. त्यांची कशी आणि कोणत्या शब्दांत समजूत करावी हेंच यमूला समजेना.

शेवटीं पहांटेच्या सुमाराला दोघांनाही डुलकी लागली.

दूधवाल्याच्या हांकेनें यमू जागी झाली. चहा करून तिनें मुकुंदरावांना उठविलें. जागे झाल्याबरोबर पुन्हां त्यांच्या चेहऱ्यावर धास्तीची प्रेतकळा पसरली. दोन दिवस मनांत चाललेल्या धडपडीनें त्यांचे डोळे खोल गेले होते. यमूकडे त्यांची नजर जातांच ती बावरून मागें फिरे. ढांसळता निश्चय, भीति, घाबरेपणा, हताशपणा असे अनेक विचार त्यांचें मन घुसळून काढीत होते.

एक पोऱ्या खिडकींतून रोजच्या वृत्तपत्राचा अंक आंत टाकून गेला. मुकुंदरावांनीं पडल्या पडल्या पडल्याच चूळ भरून अर्धवट उठून चहाचा कप तोंडाला लावला आणि वृत्त-पत्रांतल्या ताज्या बातम्यांवरून नजर फिरवली. ' **पुणें वार्ता** ' या सदरावर त्यांची दृष्टि जातांच एकदम त्यांच्या हातांतून कप खालीं पडला फरशीवर पडून खळकन् फुटला—त्यांत त्यांना धक्का देण्याइतकी पुढील बातमी होती—

" पुणें, ता. २२—शनिवार पेठेंत राहणाऱ्या, दाजीबा याच नांवानें ओळखल्या जाणाऱ्या इसमास रविवारीं दुपारीं सी. आय्. डी. चे इन्स्पेक्टर श्रीं. कदम यांनीं अटक केली. त्या वेळीं त्याचेजवळ पांच हजारांच्या नोटा सांपडल्या असून त्याबद्दल त्यांना समाधानकारक खुलासा करतां आला नाहीं. अटक करते वेळीं सदर दाजीबा यांचे खोलींतील सर्व सामान प्रवासासाठीं बांधून तयार ठेवलेलें आढळलें. ते गृहस्थ फरारी होण्याच्या बेतांत असतांनाच शिताफीनें ही अटक केली हें श्री. कदम यांना व त्यांच्या खात्याच्या कार्यक्षमतेला भूषणावह आहे. पुढील तपास चालू आहे. "

वृत्तपत्र खालीं टाकून मुकुंदरावांनीं दोन्ही हातांनीं डोकें गच्च दाबून धरलें. अंधारांत विहिरींत एक पाय जावा आणि तेवढ्यांत आकस्मिकपणें दचकून मागें सरकून जीव वांचावा असें त्यांना झालें होतें. ते अडखळत म्हणाले—"देवाची खैर, नाहीं तर दाजीबाच्या बरोबर मीही अडकलों होतों. अजून तरी बचावेन अशी आशा नाहीं मला...त्यानं कुठं तरी डल्ला मारला—त्याच्या सांगण्यावरून मीही, पेढीवरचे बँकेंत भरणा करायला दिलेले पांच हजार रुपये आणून ठेवले आहेत. रविवारीं आम्ही दोघांनीं या रकमा घेऊन पळून जायचं उत्तरेकडे अन् नांव बदलून चैन करायची मोकळेपणानें, असं त्यानंच माझ्या मनांत भरविलं होतं. कसली एवढी मोहिनी पडली त्याची माझ्या मनावर कुणाला ठाऊक! ही गेल्यापासून उबसवाण्या जिण्यांत विरंगुळा म्हणून या दाजीबाच्या संगतींत या व्यसनांत सुख लावून घेतलं—म्हटलं पुन्हां लग्न झाल्यावर शिवायचं नाहीं बाटलीला, पण एकदां पाय घसरला तो ..तें जाऊं दे, पण आतां पुढें काय करूं? या पेटींत तें विष पडलंय्. अजून आंत होतं. एव्हांना ते रुपये भरणा झाले नाहींत हें कळलंही असेल पेढीवर, अन् संध्याकाळपर्यंत दाजीबाची झाली तीच माझी गत!'

यमूनें घड्याळाकडे पाहिलें. साडे नऊ झाले होते. ती म्हणाली—'स्नान करा, देवाला नमस्कार करा अन् दहा वाजतां ताबडतोब पैसे भरून या बँकेंत. पेढीवर सांगा, शनिवारीं बँकेंत जातांना घेरी येऊन पडलों—आजारी होतों. रविवारीं सुट्टी—सोमवारीं बँक उघडतांच भरणा केला—ही त्याची पावती... अन् आतां देवाची शपथ वहा कीं पुन्हां हात लावणार नाहीं बाटलीला अन् दाजीबासारख्या मित्रांच्या सहवासांत रहाणार नाहीं. म्हणून—"

बाहेरून हांक आली—पोस्टमन्!

आंत एक पत्र भिरकावलें गेलें--मुकुंदरावांनीं तें यमूपुढें केलें. दर महिन्याला गंगूचें येणारें पत्र होतें तें...बरोबर एक पुडकें होतें—

प्रिय यमू,

दोन महिन्यांत तुझं पत्र नाहीं. तुझ्या सुखांत इतकी रमलीस कीं गरीब अभागी मैत्रिणीचीही तुला आठवण राहिलेली दिसत नाहीं--पण यमने,

तुझ्या मुखातनं माझ्यासाठीं नाहीं कां द्यायचीस थोडा वेळ ? यांचा तपास लागत नाहीं म्हणून तूं लिहिलेंस—पुन्हां यत्न करून बघ–अन् हें बघ, तूं अन् तुझ्या यजमानांनीं यांना बघितलं नाहीं ही खरी अडचण. काल कांहीं तरी चाळा म्हणून जुनं सामान उपशीत बसलें होतें. त्यांत आमचा दोघांच्या लग्नानंतर एकत्र घेतलेला फोटो सांपडला तो पाठविला आहे–डोळ्यांत प्राण आणून वाट बघतेंय् त्यांची–कांहीं सांगून भेट करीव आमची. ”

तें पुडकें सोडून फोटोकडे नजर जातांच यमूच्या तोंडून एकदम आश्चर्याचा उद्गार निघाला---मुकुंदरावही दचकून तिच्याकडे पाहूं लागले.—

—“ हे तर दाजीबाच ! ” ती उद्गारली. ताठ उभे राहिलेले केंस, खोलसर डोळे आणि बाहेर आलेले दांत पाहिल्यावर त्यांच्याबद्दल शंकाच उरत नव्हती.

मुकुंदरावांनीं झडप घालून रागानें त्या फोटोचे तुकडे तुकडे केले– ‘ आपल्या संसाराला काडी लावली, बायकोला आपल्या जिवंतपणीं वैधव्य आणलं अन् माझ्या गळ्यालाही फांस लावला होता बदमाषानं. देवाची करणी, नाहीं तर आज मीही बसलों असतों गजांच्या कोठडींत नाहीं तर दाजीबाबरोबर देशोधडी, अन् तूं बसली असतीस त्या गंगूसारखी होऊन...”

आंतल्या खोलींतील पिशवी घेऊन मुकुंदराव बाहेर पडले —जातांना यमूकडे टाकलेल्या त्यांच्या दृष्टिक्षेपांत कृतज्ञता आणि क्षमायाचना यांचे भाव भरले होते—

पण यमूच्या डोळ्यापुढें मात्र गंगूची हताश, करुण मूर्ति दिसत होती.

—काय होणार तिच्या आशेचं ?

( १९४२ )

## इषारा ! (५)

" माई ! ए माई ! इकडे ये बरं जरा ! " बाहेरच्या खोलींतून सदाशिवची हांक आली.

आंतून उत्तर आलें—'आलें हं दम धर !' पदराला हात पुशीत सरलाबाई बाहेर येऊन म्हणाल्या, ' कोण रे ? '—अन् एकदम ओशाळल्या. क्षणभर घुटमळून म्हणाल्या, ' इश्श ! कोणी हांक मारली ही ? आपण कां ? अगदीं लहान मुलांसारखं करायचं. शोभतं कां हें ? '

सदाशिव म्हणाला—' हें पहा, अगदीं जुन्या रीतीप्रमाणें ' अहो ! अग ! शुक्-शुक् ' करीत पांच मिनिटं ओरडत बसणं नाहीं आवडत मला. पण अगदीं नव्या रीतीप्रमाणें, एकाद्या मोलकरणीला हांक मारल्यासारखं 'सरल—ए सरल !' करणं हेंहि पटत नाहीं मला. म्हटलं एरव्हीं पोरं मारताहेतच हांक ' माई ! ' म्हणून. तेंच नांव संबोधन म्हणून वापरावं. '

—' सारं मुलखावेगळंच आपलं ' सरलाबाईंनीं शेरा मारला.

—' हें बघ, वसंताचं पत्र आलंय् पुण्याहून कितीक वर्षांनीं, अग दिवाळीला बोलावलंय् त्यानं. काय लिहायचं त्याला ? '

—' अस्सं ! बऱ्याच वर्षांनीं आठवण झाली वसंतभाऊजींना. '

—' चार वर्षं झालीं असतील भेटून. तेव्हां कुठं मास्तर होता पुण्यांतल्या शाळेंत चाळीस रुपयांवर—मला चुकवीत होता गरिबीमुळें. शेवटीं मीच होऊन गेलों होतों त्याच्या टीचभर खोलीवर. आतां अगत्यानें आमंत्रण देतोय्—...'

—' मग जाऊं या चार दिवस. वर्षभर एक ठिकाणीं राहून कसं आंबल्यागत होतंय्. एवढं आवर्जून आमंत्रण पाठवलंय्. फारच हलाखी दिसली त्यांची तर एक दिवस राहून मग जाऊं गेस्ट हाउसमध्यें...'

\+ \+ \+

एम्. एस्. एम्. ची गाडी पहाटेस पुण्याच्या स्टेशनांत शिरत होती. खिडकींतून बाहेर तोंड काढून सदाशिवनें वसंताचा शोध घेण्यास सुरुवात केली. 'सपाट केस', बावळट काचाचें धोतर, कळकट टोपी अन् मळकट कोट या त्याच्या नेहेमींच्या अवतारांतला वसंत त्याच्या नजरेंतून सुटणें शक्य नव्हतें. पण सारीं चिल्लींपिल्लीं उतरवून, प्लॅटफॉर्मच्या भिंतीशीं सामानाचा ढीग केला तरी वसंताचा पत्ता नव्हता. सदाशिव बेचैन झाला. सरलाबाई उगीचच मुलांवर खेंकसूं लागल्या.

इतक्यांत मागून आवाज आला—'हल्लो ! सद्या ! अरे लेका सारी गाडी पालथी घातली–फर्स्ट, सेकंड–इंटर–आलास तरी कसा ? गाडीच्या टपावरून कां थर्डच्या कोंडवाड्यांतून ?–सब ठीक वैनी ?'

—आणि सदाशिव त्याच्याकडे पहातच राहिला.

तपकिरी रंगाचा उंची वूलन सूट त्याच्या अंगावर असून हातांतल्या मऊ फेल्ट हॅटशीं तो खेळत, हंसत बोलत होता. चटकन् दोन हमाल बोलावून त्यानें सदाशिवचें सामान पुढें पिटाळलें. स्टेशनबाहेर पडून त्यानें हांक मारली— 'ए व्हिक्टोरिया ! —एरंडवणा !'

चाबूक उचलून व्हिक्टोरियावाला म्हणाला– 'छे रुपिया पडेगा साब !'

'चलो !' म्हणून वसंतानें आंत पाय ठेवला.

एक वेळीं दुर्मुखलेला, अबोल, दरिद्री कपड्यांचा अन् कंजूष असा वसंत केवळ दोन वर्षांत इतका खेळकर, रुबाबदार अन् खर्चिक कसा झाला याचें सदाशिवला कोडेंच पडलें. व्हिक्टोरिया वेगानें चालली असतांना दर नाक्यानाक्याला 'किती बदललं बाई पुणं ? ओळखूंहि यायचे नाहींत पूर्वींचे रस्ते' असे सरलाबाईंचे उद्गार निघत होते. वसंतानें घेऊन दिलेल्या चॉकोलेटचे अन् लेमन गोळ्यांचे बकाणे भरीत मुलें डोळे फाडून मोटार, टांगे, बस यांच्या गर्दीकडे पहात होतीं. रविवार, बुधवार, सदाशिव पेठ, टिळक रस्ता मागें टाकून, लकडी पुलावरून वळून त्यांची व्हिक्टोरिया प्रभात-

नगरकडे निघाली. तेव्हां सदाशिव म्हणाला, ‘ अरे बाबा ! येतंय् तरी केव्हां तुझं घर ? पुण्यांतच राहतोस कीं एखाद्या खेड्यांत ? ’

वसंत म्हणाला, ‘ हल्लीं पुण्यांतले लोक पुण्याबाहेर रहातात अन् पुण्याबाहेरून आलेले लोक पुण्यांत रहातात अशी वांटणी झाली आहे आमच्याकडे. ’

एवढ्यांत कालव्याजवळच्या एका बंगल्याजवळ त्यांची व्हिक्टोरिया येऊन उभी राहिली. तिचा आवाज आल्यावर आंतला रेडिओ बंद झाला आणि दर खिडकीच्या रेशमी पडद्यामागें एकेक कुतुहलपूर्ण चेहरा झळकूं लागला. वसंताच्या घरांतील गादीच्या कोच-खुर्च्या, गालिचे-पडदे, चित्रें या भारी सजावटीकडे सदाशिव आश्चर्यानें पहात होता. उंची चहा, बिस्किटें, शिरा यांचा समाचार घेतां घेतां त्यानें विचारलें ‘ कां रे ! पुण्यांतल्या मास्तरांना हल्लीं भाग्याचे दिवस आलेले दिसतात. ’

वसंतानें कप खालीं ठेवून अट्टाहास्य केलें. ‘ मास्तर ! विसरा आतां ! अरे हो ! पण मी तुला कळवलंच नव्हतं. नाहीं कां ? बघ. बी. एस्सी. होऊन दहा वर्षं झालीं होतीं तरी चाळीसावर रखडत होतों एका भिकारड्या शाळेंत. दर वर्षीं अर्ज करूनहि कायम करीत नव्हते मला. दोन वर्षांपूर्वीं एक दिवशीं सुपरिंटेंडंटनें मला ऑफिसांत बोलावून पंधरा रुपये महागाईभत्ता मंजूर केल्याचं सांगितलं अन् लागलीच पर्मनंट होण्याच्या अर्जावर सही मागितली. मी मुकाट्यानं तो कागद खिशांत टाकला. कंजूष माणसं एका-एकीं उदार झालीं म्हणजे त्यांच्या उपकारामागें कांहीं मोठा स्वार्थ दडलेला आहे असं खास समजावं. संध्याकाळीं एका मित्राकडून समजलं कीं खडकी अन् देहू रोड येथें फार मोठी नोकरभरती चालू आहे.

आतांपर्यंत कायम करावं म्हणून मी शाळेच्या मागं लागलों होतों.–आतां मी कायम व्हावं म्हणून शाळा माझ्यामागं लागली ! ! सगळं कशाला सांगत बसूं ! कुठं जावं, कुणाला भेटावं, कसला वशिला लावावा, काय दक्षिणा द्यावी याची सारी माहिती करून घेऊन मी अर्ज केला. माझ्या

केमिस्ट्रीनं मला हात दिला. खडकीच्या एक्स्प्लोझिव् फॅक्टरींत मी नोकरीला लागलों अन् आतां मला पांचशें पगार मिळतोय् ! '

× × ×

— रेशनिंगच्या काळांतहि वसंतानें दुपारीं श्रीखंड–पुरीचा बेत केला होता. सैंपाकघरांत सकाळपासून दुपारपर्यंत स्टोव्ह धडधडत होता. दहाच्या सुमाराला वर्तमानपत्रवाल्यानें मासिक–साप्ताहिकांचा एक गठ्ठा आंत आणून टाकला. सदाशिवच्या सरबराईसाठीं वसंतानें मुद्दाम रजा काढली होती.

जेवणें झाल्यावर रेडिओ लावून वसंत झोंपाळयावर कलंडला असतां सदाशिवनें त्याला प्रश्न केला, ' अरे, आम्ही सांगलीला पुण्यांतल्या टंचाई-बद्दल खूप ऐकत होतों. साखर फार कमी, अन् वीजवाल्यांना रॉकेल नांवा-पुरतं. तांदूळ-गहूंहि कमी अन् कडवट बार्लीचं पीठ खावं लागतं. विजेचे बल्ब मिळत नाहींत ? दुधाचा अगदीं तुटवडा आहे. पण तुझ्याकडे तर सारी आबादी आबाद दिसतेय् ? '

' स्टेट एक्स्प्रेस ' सिगारेटस्चा डबा फोडीत वसंत उत्तरला–' प्रश्न हजार पण उत्तर एक ! बाबा सदाशिवा, एक शब्द लक्षांत ठेव म्हणजे झालं–' ब्लॅक् मार्केट ! ' या बाजारांत कसलीहि टंचाई नाहीं, कसलाहि निर्बंध नाहीं. फक्त पैसे मोजा अन् पावती मागूं नका म्हणजे झालं. अच्छा ! अब आराम करो ! रात्रीं जागरण झालं असेल. संध्याकाळच्या सिनेमा–शोचीं तिकिटं रिझर्व केलीं आहेत. मी जाऊन येतों जरा माझ्या ब्रोकरकडे. जरा गंमत म्हणून चांदी अळशीची तेजी–मंदी खेळतों मी मधून मधून. '

पितळी कड्यांच्या झुलत्या पलंगावर सदाशिवनें आरामांत तीन तास झोंप काढली. दुपारचा इंटर्व्हल संपून संध्याकाळचे प्रोग्रॅम सुरू झाले तरी रेडिओ तसाच सुरू होता. त्याच्या कडकडाटानें कंटाळून सदाशिवनें तो बंद करून टाकला. चूळ भरून एक मासिक उघडलें.

आंतल्या खोलींतून वसंतरावांच्या पत्नीचा हंसरा आवाज येत होता. त्याला अभिमानाची झार चढली होती. कपाटांचीं दारें, ट्रंकांची झांकणें,

लाचे खण धडाधड उघडत–झांकत होते. रेशमी कपड्यांची सळसळ, दीच्या भांड्यांची मंजुळ खणखण हे ध्वनि बाहेर ऐकूं येत होते. मालतीबाई पलं वैभव पाहुण्या बाईंना दाखवीत होत्या त्यांचे तुटक शब्द बाहेर सदाशि- या कानांवर येत होते...' हें जॉर्जेटचं पातळ अडीचशेंला पडलं...हिऱ्याच्या ड्या बाराशेंच्या...हा बनारशी शालू पांचशेचा...पंधराशेंचं अस्सल त्यांचं पेंडं करवलं मी. म्हटलं भिकाऱ्यांसारखं कल्चर फिल्चरचं नको मला हीं. रेडिओ घेतला तोहि चांगला नऊशेंचा आठ व्हाल्व्हचा. आमचा पाहून जाऱ्यांनीं घेऊन घेतला तर काय म्हणे 'क्यू–एलेव्हन' [ Q11 ] तीनशें ळाचं पांच व्हाल्व्हचं डबडं ! मी साफ म्हटलं, मिळताहेत पैसे तर कां न करूं नये ? पुढचं कोणी पाहिलंय् ? पण माझं जाऊं द्या बाई ! तुम्ही य काय केलंत गेल्या दोन वर्षांत तें सांगा !' संध्याकाळचा चहा घेऊन लाबाई बाहेरच्या खोलींत आल्या तेव्हां त्यांचे डोळे लाल अन् ओलसर सत होते.

रात्रीं सिनेमाला जाऊन आल्यावर अंथरुणावर पडल्या पडल्या लतीबाईंच्या उर्मट, अभिमानी, श्रीमंतीच्या प्रदर्शनाचा पाढा सरलाबाईंनीं ाशिवपुढें वाचला. मुलं म्हणालीं–' आमचे कपडे पाहून सारखे भेकारी–भिकारी ' म्हणून चिडवीत होतीं आम्हांला तीं मुलं. आम्हाला ते ती अभिमानानं सांगत होते...' वडील गेल्यावर ऐटींत आम्ही त्यांच्या गारेटी ओढतों. त्यांच्या खिशांतले पैसे काढून घेऊन शेजारच्या सुमनला ाण्याच्या हॉटेलमध्यें घेऊन जातों–तिला एरिंग–रिबनी घेऊन देतों–टेकडी- गं फिरायला नेऊन गंमत गंमत करतों......'

' गाढवा ! ' म्हणून सदाशिवनें आपल्याच मुलाच्या थोबाडींत दिली.

दुसऱ्या दिवशीं पहाटे पांच वाजतांच घरांत वर्दळ सुरू झाली. सदा- व बाहेर आला तों वसंत अंगाला टॉवेल गुंडाळून बाथरूममधून बाहेर होता. तो म्हणाला, ' अरे, झोपमोड करूं नको तुझी. हें आमचं रोजचंच न्हिक आहे. स्नान, चहा, फराळ आटपून सातला बाहेर पडावं लागतं

आम्हाला. रात्रीं आठाला यायचं घरीं—दुपारीं जेवणाचा डबा येतो घरून. रात्रीं नाटकाचा प्रोग्राम ठेवूं आज. अन् हें बघ, तूं आहेस आठ दिवस इथं. वेळ झाला तर जरा बघ रे पोरांकडे—कारटीं फार वाह्यात झालींत. मी दिवसभर घरीं नसतों-अन् आई फिरते सदा बड्या मैत्रिणींच्या घोळक्यांत. पांचगणीलाच पाठवून देईन त्यांना पुढच्या वर्षीं म्हणतों......'

आठ दिवस कुठले ! तीन दिवसांतच सदाशिवला वसंताच्या घरांत परक्यासारखं वाटूं लागलं. दिवसभर वसंत बाहेर. दुपारचीं जेवणें आटपलीं म्हणजे मालतीबाई बंगल्या—बंगल्यांतल्या मैत्रिणींच्या भेटीचा दौरा काढीत. मुलें दोन वाजतांच शाळेला नमस्कार ठोकून घरीं येत. सदाशिव अन् सरला जशीं घरांत नाहींतच असं समजून घरभर गोंधळ घालीत. त्यांच्या देखत स्वतः कुरापत काढून त्यांच्याच मुलांना चोप देत. त्यांच्या बोलण्या-चालण्याची नक्कल करीत. मुद्दाम मोठ्यानें म्हणत, ' भिकाऱ्यांचा तांडा कुठं उतरलाय् रे जवळपास ? ' दोन दिवसांत आपली सारी बढाई आणि श्रीमंतीची आरास दाखवून झाल्यावर मालतीबाईंचें औत्सुक्यहि मावळलें. साध्या वेशभूषेच्या सरलाबाईंना बरोबर घेऊन बाहेर पडण्याची त्यांना लाज वाटत असे असें स्पष्ट दिसल्यानें सरलाबाईंनीं आपण होऊन त्यांचा नाद सोडला. एक दिवशीं त्या बाहेर गेल्या असतां सराफ आणि कापडवाल्यांचे मुनीम आपल्या वसुलीच्या वह्या घेऊन हेलपाटा घालून गेले. त्यांच्या बोलण्यावरून कळलें कीं, मालतीबाईंच्या कुड्या, पेंडें, शालू यांचीं बिलें वर्ष झालें तरी द्यायचीं राहिलीं होतीं--त्यावर एकोत्र्यानें व्याज चढत होतेंच !

त्या दिवशीं रात्रीं सदाशिव म्हणाला—' वसंत ! चार दिवस फार मजेंत गेले आमचे साऱ्यांचे. उद्यां सकाळच्या गाडीनं जाईन म्हणतों आतां. अशा महागाईत किती भार टाकायचा दुसऱ्यावर ? '

वसंत एकदम उठून म्हणाला ' छे--छे ! अरे, पंधरा वीस दिवस तर रहाशील ! अजून तुला पुण्याच्या किती तरी गमती दाखवायच्या आहेत. एखाद्या रविवारीं ट्रिप--नाटक-जलशाचा बेत राहिलाय् अजून—'

सदाशिव म्हणाला–'हें पहा वसंत, या गोष्टींचा मला शौक नाहीं. अन् सारं संभाळून आहे या पगारांतहि ही चैन तूं कशी करतोस हेंच मला कळत नाहीं. कांहीं शिल्लक टाकतोस कां ?'

—'शिल्लक ? अरे बाबा ! पगार पुरत नाहीं महिन्याला. किती तरी सामान उधारीनें आणलं आहे मी.'

'—कां ? अगदीं जरूरच होती कां या साऱ्या पसाऱ्याची ? कुठें घर केलं असतंस, सोनं-चांदी घेऊन ठेवली असतीस तर त्यांची किंमत टिकली असती पुढं. तुझ्या या साऱ्या उंची सामानाची पावपट तरी किंमत देईल कां कोणी लढाई संपल्यावर ?'

वसंताचा सूर जरा चढला. 'सदाशिव ! माझा संसार आजच लिलांवाला काढल्यासारखा बोलतोस रे ? कां बघवत नाहीं कां जरा माणसानं सुखांत राहिलेलं ?'

सदाशिवची मान खालीं वळली. तो खिन्नपणें म्हणाला, 'हेंच–हेंच वाईट वाटतं मला. तुझ्या चांगल्यासाठीं मी सांगतों याचा विपर्यास करून द्वेष चिकटवतोस तूं माझ्या अंगाला. याहून वैभवांत रहावंस तूं--आनंद वाटेल आम्हाला. पण तें वैभव टिकणारं हवं. आजची युद्धकाळची शिराळ-शेटी किती दिवस टिकणारी आहे याबद्दल विचार केला आहेस कां तूं ? सगळ्यांना विचारलं. तुझ्यासारखा अनुभव. फुलबाजांसारखे पैसे जाळताहेत सारे. चार क्षणांनंतर अंधार अन् कडवट धूर उरेल तो मात्र जन्माला पुरेल. माफ कर स्पष्ट बोलल्याबद्दल. तुझा जुना मित्र आहे मी. तुझं बरं व्हावं म्हणून सांगतों. अजून चार पैसे मागं टाकलेस तर युद्धानंतरच्या हलाखींत उभे रहातील तुझ्या शेजारी. आज अधिकार आहे तुझ्याजवळ, ओळखी आहेत—नीट पाहून आपली चांगली जागा पकडून ठेव एखाद्या व्यापारांत. लढाई संपायच्या बेताला येत आहे. एकदां बेकारीचा लोंढा फुटला म्हणजे कोणाचे पाय टिकायचे नाहींत जमिनीवर... 'इषारा' देणं माझं कर्तव्य आहे. न पटला तर सोडून दे. अन् हें बघ, उद्यां सकाळच्या गाडीनं जाऊं आम्ही.'

वसंताच्या बोलण्यांत आतां रुक्षपणा आला होता. तो तुटकपणें ह्मणाला, बरंय्, तुझ्या मनाप्रमाणें होऊं दे. आलास, बरं वाटलं मला. शेवटची उपदेशाची लहर आली नसती तुला तर फार बरं झालं असतं ' असें म्हणून तो उठून गेला.

सदाशिव—सरलेनें रात्रीं सारी बांधाबांध केली. सकाळीं लकडी-पुलावर जाऊन त्यालाच टांगा करावा लागला. सरलाबाईला जातांना कुंकू लावायलाहि मालतीबाई पुढें झाल्या नाहींत. सरलाबाईनेंच आंत जाऊन आमंत्रण दिलें– ' येत्या नाताळांत या आमच्याकडे सांगलीला. ' पण यावर जरा मान वेळावल्याचेंच उत्तर मिळालें. त्यांच्या हातांत खण अन् प्रत्येक मुलाच्या हातांत रुपया देऊन सरलाबाई टांग्यांत बसल्या.

सदाशिव सांगलीला पोंचल्यानंतर दोन दिवसांनीं त्याच्या पत्त्यावर वसंताकडून एक जाडसा लिफाफा आला. ही आणखी काय लांबलचक भानगड आहे म्हणून जरा भीतभीतच त्यानें पत्र फोडलें. तें असें होतें:—

मित्रवर्य सदाशिव यांस—

' तूं जातांना मी ज्या रीतीनें वागलों त्यावरून माझें ताबडतोब पत्र येईल अशी तुझी अपेक्षा नसेलच. पण तुझ्या स्पष्टपणाबद्दल आभार मानून तुझी क्षमा मागण्यासाठीं मी हें पत्र लिहीत आहे, हें पाहून तुला आश्चर्य वाटेल. मला उपदेशाचा डोज पाजून तूं निघून गेलास--पण दुसऱ्या दिवस-भर ते विचार माझ्या मनांत घोळत होते. रात्रभर मला झोंप आली नाहीं. पहाटेच्या सुमाराला मला एक स्वप्न पडलें—तें अजून ठळकपणें माझ्या डोळ्यांपुढें दिसत आहे...'

...' लढाई संपून मी बेकार झालों आहे. माझ्या दाराशीं चार मारवाडी अन् बेलीफ उभे असून माझें उंची फर्निचर, रेडिओ, भारी कपडे, दागिने यांचा लिलांव चालला आहे. भोंवतालीं खूप गर्दी जमली असून टेबला-वर नोटांचा ढीग पडला आहे. मी त्या घेऊं पहातों तों मला ढकलून देऊन बेलीफ—मारवाडी निघून जात आहेत...मी माझ्या जुन्या शाळेंत सुपरिं-टेंडंटकडे पुन्हा नोकरीची याचना करीत आहे आणि तो उपहासानें हंसत

आहे...घरीं येतों तों घराला कुलूप लागलें असून, घराच्या पायऱ्यांवर चार मळकीं गांठोंडीं पडलीं आहेत. जवळच झिंज्या तोंडावर आलेली मालती रडत बसली असून मुलें भोंवतीं ' भूक--! भूक ! ' म्हणून ओरडत आहेत. ' त्या ओरडण्याच्या आवाजानें मी एकदम दचकून जागा झालों....

माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला होता, छाती जोरजोरानें उडत होती. मी दिवा लावून भोंवतीं पाहिलें. सारी सजावट होती तशीच होती. मी समाधानाचा सुस्कारा सोडला. अंधारांत एखाद्या कड्याच्या टोंकाजवळ पाय जावा, आणि त्याच वेळीं वीज चमकून पुढची खोल दरी दिसावी असं मला झालं. याचं सारं श्रेय तुला आहे. तूं म्हणालास त्याप्रमाणें अजून वेळ गेली नाहीं. अजून किंमती चढलेल्या आहेत तोंच माझ्याजवळच्या भारी वस्तु मी काढून टाकीत आहे. उपयुक्त आणि जम बसलेल्या वस्तु तयार करणाऱ्या एका कारखान्यांत भागीदारी घेऊन केमिस्ट म्हणून काम करण्याची तयारी आगाऊ करून ठेवीत आहे. या नव्या दृष्टीबद्दल तुझे शतशः-सहस्रशः आभार ! दिवाळींत कडवटपणानें गेलास, नाताळांत गोडव्यानें परत ये. पत्रानें न आलास तर सांगलीला समक्ष येऊन तुला घेऊन जावं लागेल. माईंना नमस्कार सांग. "

सदाशिवनें पत्र खालीं ठेवलं. त्याला आपली खोली एकदम उजळल्यागत वाटूं लागली. त्यानें खुर्चीत येऊन हांक मारली.

" माई !--ए माई ! "

आंतून उत्तर आलें ' दम धर, आलें हो ! ' बाहेर येऊन सरलाबाई हंसून म्हणाल्या--" आपणच कां हांक मारली !--अजून नाहीं वेड जात ? अशा जगावेगळ्या वागण्यानंच सारे नांवं ठेवतात आपल्याला, अन् नको तिथं उपदेश करण्यानं रागावतात. इतका जीव तोडून सांगितलं वसंत-भाऊजींना; पण काय श्रेय दिलं त्यांनीं आपल्याला ? "

" तूंच पहा तें " म्हणून सदाशिवनें तें पत्र तिच्यापुढें टाकलें.

[१९४४]

# समाजसेविका ! (६)

चपलाबाईंनीं जांभई देऊन एक ऐसपैस आळस दिला. एक मखमली उशी मांडीवर घेऊन, तिच्यावर कोपरें टेकून त्या गादीच्या कोचावर सावरून बसल्या.

" हं, मग काय सुचवीत होतां तुम्हीं ? "

चपलाबाईंच्या आळस देण्याच्या मोहक क्रियेंत वर झालेले गोल दंड उंचावलेलें वक्षस्थळ आणि कमरेला मिळालेली मुरड यांकडे भुजंगरावांची दृष्टी खिळली होती. या प्रश्नानंतर जरा चपापून त्यांनीं आपली नजर जमिनीकडे वळविली. ते म्हणाले, " म्हणजे मी सुचवीत होतों आपल्याला एक मार्ग. समाजसेवेच्या पवित्र आणि जबाबदारीच्या कार्यांत आपल्यासारख्या श्रीमंत आणि सुशिक्षीत महिलांनींच इतरांना धडा घालून दिला पाहिजे. "

केसाची बट सांवरीत चपलाबाई लाडिकपणें म्हणाल्या,

—" पण मला बाई त्या महारामांगांच्या बायकांत जाऊन शिकविणें अन् भाषणें देणें नाही आवडत. पण पहातें तर अशाच बायकांचीं नांवें नेहमी छापून येतात. त्याच्याशिवाय दुसरा कांहीं मार्ग नाहीं कां ? समाजसेवा तर आहेच म्हणा, पण त्याबरोबर थोडं नांवहि झालं पाहिजे. पैसा मेला नकोय् मला, पुष्कळ आहे घरीं–पण त्याऐवजी दुसरं कांहीं–"

" वा वा अवश्य ! पण आपल्यासारख्यांनीं त्याच्यासाठीं यत्न करायची जरूरीच नाहीं. आपल्यामागें होऊन धांवून येईल नांवलौकिक. आमची शाळा आहे कीं ! आपलीच समजा ती म्हणजे झालं. मी मार्ग सुचवणार होतों तो हाच. आपल्या सवडीप्रमाणें दररोज दोन तास येऊन शिक्षण प्रसाराच्या पवित्र समाजकार्याला हातभार लावावा अशी आग्रहाची विनंति आहे. माझ्यातर्फे समाजच बोलतो आहे असं समजा. अहो,

आपल्या देशांत शेकडा अठ्यांयशीपूर्णांक दोनपंचमांश लोक अशिक्षित आहेत हें ध्यानांत आहे ना? आपल्यासारख्या श्रीमंत सुशिक्षित महिलांनीं पुढें येऊन निर्वेतन अध्यापनाचे कार्य केलें तर केवढी देशसेवा होणार आहे!"

"ते समजलं हो! पण यानं माझ्या पोझिशनला कमीपणा येणार नाहीं ना?"

–' वा! अहो तसं झालं तर मी सुचविलं तरी असतं कां? तुमच्यापेक्षा मला जास्त काळजी आहे तुमच्या पोझिशनची. ही नावं पहा: या बॅरिस्टरीणबाई, या सबजज्जीणबाई, या कॉंट्रॅक्टरीणबाई अशा आपल्याच दर्जाच्या महिलाही निर्वेतन कार्य करीत आहेतच कीं आमच्या संस्थेत! पण कांहीं म्हणा, आपलं तुम्हाला म्हणूनच सांगतों बरंका, चपलाबाई! कुठल्याही बाबतीत तुमची बरोबरी नाही करतां यायची त्यांना. इतकं असूनही जिकडे तिकडे त्यांचाच उदो उदो! त्यांच्यामागे आमच्या संस्थेचा लौकिक आहे. म्हणून म्हणतों, तुम्हीही कार्याला सुरवात करा. बाकीचं सारं माझ्याकडे लागलं. संस्थेच्या वार्षिक रिपोर्टात आपल्याबद्दल सबंध पानभर गौरवपर मजकूर घालणार आहे मी, आणि बक्षिस समारम्भाचे वेळी कलेक्टरकडून तुमचा जाहीर गौरव करणार आहे. पण–डॉक्टरसाहेबांचा रोष तर व्हायचा नाहींना आमच्यावर हें सुचवल्याबद्दल? म्हटलं–त्यांची ही संमति...'

चपलाबाई एकदम उसळल्या. 'म्हणजे! त्यांची परवानगी घ्यायला मी कांही गुलाम आहे की काय त्यांची? बस्स ठरलं! आतापर्यंत वाटत होतं कशाला दगदग करावी उगीच. पण तुम्हालाही वाटायला लागलेलं दिसतंय की कांही करायला मला त्यांची परवानगी घ्यावी लागणार आहे म्हणून. मग इतरांना काय वाटत असेल? माझी एकच अट आहे की, त्या कॉंट्रॅक्टरीण, सबजज्जीण आणि बॅरिस्टरीणबाईंच्यापेक्षां वरचढ नांव झालं पाहिजे माझं. त्यासाठी शिकवीन हवंतर तुमच्या शाळेंत. उगीच त्यांचाच तोरा नको समाजसेविका–म्हणून! मी सुद्धां होऊन दाखविन समाजसेविका.'

भुजंगरावांनी घड्याळाकडे पाहिलें. कारण त्यांचे सर्व काम झालें होतें. चहा फराळाच्या बशा केव्हांच रिकाम्या झाल्या होत्या. चपलाबाईंचें सौन्दर्यही

डोळ्यांत सांठवून झाले होतें, आणि परवांपासून त्यांचा सतत सहवास होण्याचीही आपोआप तजवीज झाली होती.

"अरे बापरे! सव्वादहा झाले कीं" उठून उभे रहात ते उद्गारले, "बाकी आपल्याशी बोलत बसलें म्हणजे वेळेचें भानच रहात नाहीं. याचें कारण काय असेल ते असो" म्हणून त्यांनीं चपलाबाईकडे एक अर्थपूर्ण नजर टाकली. त्याला चपलाबाईंच्या मान वेळावण्यानें अशब्द उत्तर मिळालें आणि खूष होऊन ते निघून गेले.

❀ ❀ ❀

अकरा वाजतां शाळेंतील सुपरिंटेंडेंटच्या खोलीतील घंटा करंकन् वाजली. पट्टेवाल्याकडून निरोप गेला आणि एक डोळे खोल गेलेला, दरिद्री वेषाचा फिकट तरूण यांच्या टेबलासमोर येऊन उभा राहिला. पांच मिनिटें झालीं पण सुपरिंटेंडेंटसाहेबांनी डी. पी. आय्. च्या पत्रांच्या फायलींतून डोकेही वर केलें नाहीं. तो तरूण जागच्याजागीं चुळबूळ करीत होता. शेवटी तो जरा खांकरला. भुजंगरावांनी कपाळावर आठ्या चढवून डोकें वर केलें.

"कोण! मिस्टर जोशी नाहीं कां? आ यस्! उद्यां पहिली तारीख. आज तुमचे बिनपगारी उमेदवारीचे तीन महिने संपतात नाही कां?"

"होय साहेब. शक्य तितक्या काळजीने काम केलं आहे मी. तीस पिरीयड्स काम घेत होतो आठवड्यांतून. शिवाय आठवड्याचे पेपर्स आणि कॉंपोझिशनच्या वह्या माझ्याकडेच होत्या–"

"आ यस्! ते सारं आहे माझ्या ध्यानांत. पण मिस्टर जोशी, सांगायला वाईट वाटतं मला, कीं तुमच्या कामाचे रिपोर्ट चांगले नाहींत!"

जोश्यांचा चेहरा एक छटेने अधिक पांडुरका झाला. ते म्हणाले, "पण साहेब, साऱ्या लेसनच्या नोट्स आधींच हेडमास्तरांना दाखवून दुरुस्त करून घेतल्या होत्या मी. त्यांच्यासमोर घेतलेल्या लेसन्सवर 'उत्तम' म्हणून शेरा दिला आहे त्यांनीं–"

भुजंगरावांचा सूर जरा चढला—" मिस्टर जोशी ! हें तुमचें तुम्ही सांगावयाची जरूर नाहीं. मला कळतंय्. तुमच्या मुर्वतीखातर हेडमास्तरांनी दिलेल्या रिपोर्टाची काडीची किंमत नाहीं. हे पहा, मला फार बोलायला वेळ नाहीं. तुम्हाला म्हणून तीन महिने ट्रायल दिली. काम पसंत नसल्यास केव्हांही नोटीस न देतां कामावरून दूर करावें असे तुम्ही लिहून दिलेलें संस्थेच्या दप्तरीं आहे. वाईट वाटतें मला कीं, मी तुमच्यासाठीं कांहीं अधिक करूं शकलों नाहीं. उद्यांपासून कामावर येऊं नका तुम्ही. तुमच्यासाठीं म्हणून फार तर एक चांगले सर्टीफिकेट देईन मी. आमच्या शाळेचा लौकिक साऱ्या महाराष्ट्रांत, अन् बृहन्महाराष्ट्रांत पसरला आहे. आमच्या एका सर्टीफिकेटाच्या जोरावर तुम्हाला कोठेहि चांगली नोकरी मिळूं शकेल."

जोशांचा चेहरा आतां पूर्णपणे पांढराफटक पडला होता. त्यांच्या खोल डोळ्यांत पाणी चमकूं लागलें. त्यांचे हात थरथरत होते. कांपऱ्या आवाजाने ते म्हणाले, " साहेब, ईश्वरसाक्ष सांगतों, अगदीं अंग मोडून, मन लावून काम केलं आहे मी. खरं सांगतों. मी अन् बायकामुलें तीन महिने झाले, एक वेळ जेवून राहिलों आहोंत. उद्यांच्या तारखेवर नजर ठेवून राहिलो आहो ! आपल्या नोकरीच्या नांवावर वाणी अन् घरमालकाचे साठ रुपये थकूनही ते स्वस्थ राहिले आहेत. पांच रुपये कमी पगार द्या, पण नाहीं म्हणू नका साहेब–तीन जीवांच्या जगण्याचा प्रश्न आहे हा—"

' हें पहा मिस्टर जोशी, डोंट मेक ए सीन हिअर ( तमाशा करूं नका येथे. ) आम्हाला संस्था चालवायची आहे, अन्नछत्र उघडायचे नाहीं. आमच्या पवित्र, उदात्त–शिक्षण कार्याच्या महत्वाची तुम्हाला कल्पना नाहीं, तुमच्या संसाराचेंच रडगाणे तुम्हीं चालविलें आहे. पण सारेच तुमच्यासारखे स्वार्थी नसतात. आजच आम्हालाही ऑफर आली आहे बघा. चपलाबाई एम. ए. या विदुषी उद्यांपासून आमच्या शाळेत निर्वेतन, अगदीं

मोफत शिकवायला येणार आहेत, त्यांच्याकडेच तुमचें काम देणार आहे मी. आतां तुम्हीच सांगा, त्यांच्यासारख्या एम. ए. विदुषी समाजकार्य म्हणून निर्वेतन काम करावयास तयार असल्यावर, तुमच्यासारख्या थर्डक्लास ग्रॅज्युएट शिक्षकाला भर पगार देऊन आम्ही कां ठेवावें ? रडून सोंग करावयाचें कारण नाहीं येथें. पवित्र शिक्षण मंदिर आहे हें. शिपाय् ! यांना घेऊन जा फाटकाबाहेर ! '

× × ×

दुसऱ्या दिवशी अकरा वाजतां चपलाबाई एम. ए. आपल्या मोटारी-तून शाळेकडे ' समाजसेवा ' करावयास निघाल्या होत्या. मोटारीच्या मऊ गादीवर रेलून त्यांनी वृत्तपत्राचा ताजा अंक उघडला. त्यांत पहिल्या पानावर भडक हेडिंग होतें.

' बेकार शिक्षकाची आत्महत्त्या '

बेफिकीरीने तिकडून नजर काढून चपलाबाईनीं ' वेषभूषा आणि शृंगार ' या सदराचें पान उघडलें. त्याशेजारीं चपलाबाईचा फोटो छापला होता. त्यांत खाली ठळक नांव होतें.

## पुण्याचें भूषण

——, शिक्षणप्रेमी, समाजसेविका, श्रीमती सौ. चपलाबाई

एम्. ए.

[१९४१]

# खरें खोटं ! (७)

‘ दादा ! अहो तात्या ! रावसाब वाइच अैका माजं ’

अगदीं काकुळतीला येऊन एक जख्ख म्हातारा मोठ्या पोष्टाच्या पायरीवर बसून येणाऱ्या जाणाऱ्यांना हांका मारीत होता. त्याचे फाटके कपडे, थरथरते हात आणि डुलती मान यांकडे तिरस्काराची नजर टाकून सारे लोक निघून जात होते.

पुण्यांतला माझा मुक्काम एक दिवसाने वाढला म्हणून मुंबईला घरच्या पत्त्यावर तार करून मी लक्ष्मीरोडवरील भव्य पोष्टऑफिसाच्या दगडी पायऱ्या उतरत होतों. तेवढ्यांत त्या म्हाताऱ्यानें मलाही हटकलेच. आपल्या जागे-वरून कष्टाने उठून त्याने माझ्या पायांना हात लावला.

‘ तात्यासाब, मी भीक न्हाइ मागत. माजं म्हाताऱ्याचं बोलणं वाइच अैकून घ्या–देव बरं करील तुमचं ’ बोलतां बोलतां त्याला धाप लागली.

‘ असे इकडे या म्हातारेबुवा, काय म्हणणं आहे तुमचं ? ’ त्याला बाजूला नेऊन मी प्रश्न केला. तिरस्कार करून निघून न जातां मी त्याचं बोलणं अैकण्याची तयारी दाखविली यानेंच त्या म्हाताऱ्याला हायसें वाटलें दोन मिनिटें स्वस्थ बसून त्याने नीट श्वास घेतला आणि मग तो सांगू लागला ‘ तात्यासाब ! माज्या पोराला एक ‘ कारट ’ लिवायचं हाय. आज सकाळपून बसलो हतं कुणीतरी तीन पैशाचं कारट घेऊन देईल, अन् चार अक्षरं लिवून देईल. पण कुणी बगीतलबी न्हाई अन् ऐकलंबी नाहीं. आपनच धेव मानुस भेटलांत. विठोब्बाराय कल्यान करील आपलं. साठ वर्सं माळ आहे या गळ्यांत पंढरीरायाची; कंदी खोटं ठरणार न्हाअी या म्हाताऱ्याचं. ’

‘ बरं बरं–ते जाऊं दे ’

फौन्टन पेनचं झांकण काढीत मी संकोचाने म्हणालों. ' कार्ड आहे माझ्या खिशांत ! कोणाला लिहावयाचं अन् काय लिहावयाचं तें अगदी थोडक्यांत सांग. '

—' दगडूला लिवा की म्हातारा लइ हैरान है '

' हा दगडू कोण तुमचा ? पत्ता काय लिहायचा ? ' मीं विचारलें.

मग पत्राचा मजकूर बाजूलाच राहिला. जरा खुर्शीत येउन म्हातारा तंबाखूची एक चिमट तोंडांत टाकून मला सारी कुळकथा सांगू लागला. गारगोटी सारख्या त्याच्या थंड अन् मंद डोळ्यांत अभिमानाची चमक तळपूं लागली.

' कोन म्हनून काय इच्यारतां तात्यासाब ? अहो दगडुबा माजा मुलगाच की. एकला एक पन लअी गुनाचा. चार मुलं झाली तात्या ! पांडुरंगाच्या कृपेनं, पण त्याची इच्छा. त्यांतली तीन आईसकट त्यानंच नेली आपल्या दरबारला. माझ्या म्हाताऱ्याची काठी ही एकच. लअी गुनाचा माझा दगडूबा बरं ! कसं फाडफाड बामनावानी विंग्रजीबी बोलतो, अन मोटार हाकन्यांत तर त्याचा हात धरायला कुनाची माय व्याली हाय समद्या पुन्याममईत. घरधनीन ग्येली, तिचं किडूकमिडूक विकूनश्यान प्वोराला मोटर फिरवाया शिकवलं म्या पुन्यांतच. दोन वर्स इतच सर्विसच्या गाडीवर व्हता बगा. पन कुना शिपायानं अदावतीनं त्याच्यावर खटला भरला अन् लअी लअी त्रास दिला तात्यासाब. कर्ज क्येलं–दंड भरून सुटला, अन् अतां ममअीला राइला हाय कुना वकिलाकडं मोटार हाकायला. जाताना मला म्हंगाला, महिन्याकाठी पांच धा रुपय धाडीत जाअीन तुला पोटाला, पन च्यार महिनं झालं पैसबी न्हाअीती, अन् ब्वोटभर खुशालीची चिठीबी नाहीं. "

" उडवीत असेल पैसा चैनीत दुसरं काय " मी म्हणालो.

अचानक कोणीतरी आंगावर सप्‌कन काठी ओढावी अशा दुःखा-वेगानें तो म्हातारा एकदम हाताचा पंजा हलवीत म्हणाला, " नग नग

तात्यासाब ! असं वंगाळ नका बोलूं माझ्या दगडोबाला ! लई गुनाचा प्वोर बरं ! कंदीं निशापानी न्हाई, कीं आवाच्या पदराचा वारा म्हाईत न्हाई बरं माज्या पोराला. जिवाला बरं नसल—मालकानं पैसं दिलं नसतील म्हणून-श्यान नसल पाठविला पैका. हं ! काय म्हंगत होतों मी ? असं नीट लिवा माज्या दगडूला—

" लई दीस झालं. तुजी खुशीखबर कळली न्हाअी. म्हातारा दम्यानं लइ हैरान है. घरचं दाणदुणं समदं सरलं. मारवाडी उधार बी देत न्हाइ अतां. अक्षी तुज्याकडं डोळं लावून, जीव धरून बसला है. कसंबी करून पांच धा रुपयं धाडून दे पोटाला. आतां म्हाताऱ्याचं लअी दीस उरलं न्हाअींत... " सांगतां सांगतां त्याचा गळा दाटून आला, डोळ्याच्या कोपऱ्यां-तले अश्रु त्यानें थरथरत्या बोटानें पुसले.

मी पत्र लिहून पुरें केलें आणि विचारलें,

" म्हातारबाबा, आतां तुमच्या दगडूचं पुरतं नांव आणि पत्ता सांगा बरं ! "

एखादा हरिपाठाचा अभंग आठवून म्हणावा तसा सगळा पत्ता त्यानें पाठ म्हणून दाखविला.

दगडू महादू पडवळ,
मोटार डावर
गोविंदराव धारप वकीलांच्या घरीं
झावबाची वाडी, गिरगांव, मममई

माझें पेन हातून गळून पडलें. म्हणजे हा म्हातारा माझ्याच मोटार ड्रायव्हर दगडूचा बाप तर ! माझ्याच मुंबईच्या पत्त्यावर हें पत्र जाणार ! माझ्या डोळ्यापुढें दगड्या ड्रायव्हरची इरसाल मूर्ती उभी राहिली. इस्त्रीच्या ड्रायव्हर सूटवर ऐटीनें कललेली फरकॅप, रंगलेल्या तोंडातली सिगारेट, दारु-बंदी झाल्यावरचे त्याचे कल्याणचे फेरफटके आणि फोरास रोड, सुखलाजी स्ट्रीटवरील त्याच्या वाऱ्यांची माझ्या कानीं आलेली कुणकुण—आणि मृत्यूच्या

कांठावर उभा राहिलेला त्याचा बाप मला पुन्हां पुन्हां सांगत होता. " लअी गुनाचा पोर बरंका—कंदी निशापानी न्हाअी, की आवाच्या पदराचा वारा म्हाइत न्हाअी माज्या पोराला. तात्यासाब ! शीक असल न्हाअीतर मालकानं पैका दिला नसल. लअी हैवान अन् गुरमीचं असत्यात ममईचं मालक म्हन-त्यात. न्हाअीतर माजा दगडोबा या म्हाताऱ्याला कंदी न्हाअी इसरायचा."

आतां काय सांगू मी या म्हाताऱ्याला ? दोन दिवस आणखी असेच गेले तर पटकन भुकेजून टांचा घाशीत प्राण टाकायचा हा. शेवटी मी खोटं बोलण्याचा निश्चय केला. नाहीं तर वकील कशाला झालों ? बळेंच आश्चर्य आणि हंसू तोंडावर आणून मोठ्यानें म्हणालों—

" वा ! म्हातारेबुवा ! भली केलीत की ! अहो तुमचं नांव आणि पत्ता आधीं कां नाहीं सांगितला ? माझंच नांव गोविंदराव धारप. पुण्याला एका अशीलाला सल्ला देण्यासाठीं आलों होतों मी. अस्सं ! आमचा दगडू ड्रायव्हर तुमचा मुलगा तर ?

—" पंढरीनाथ !" असं मोठ्यानें सद्‌गदित आवाजांत म्हणून म्हाताऱ्यानें चटकन् माझ्या पायावर डोकंच ठेवलं. कससंच होऊन मी लागलींच त्याला वर उठविलें.

" हें काय भलतंच ? तुमच्यासारख्या म्हाताऱ्या माणसांनीं असं लाजवूं नये आम्हाला ! "

पण तो म्हातारा कांहीं ऐकण्याच्या मनःस्थितींत नव्हता.

" पांडुरंगा ! माझ्या दगड्याचे धनीसाब आपण. पांडुरंगच भेटला मला आपल्या रूपानें. आनंद ! लई आनंद झाला. कसा हाय माझा दगडू ? लई वाळलं असल पोरगं ममईच्या हवेनं ! "

—" चांगला आहे तब्येतीन तुमचा दगडू, अन् हे बघा. तुम्ही भेटलांत त्यामुळं माझंही मोठं काम झालं. इकडे येतांना दगडूनं तुमचा पत्ता लिहून दिला तो प्रवासांत हरवला कुठेतरी. "

मी अगदीं दडपून खोटें सांगत होतों. म्हाताऱ्याच्या खुलास चेहऱ्याकडे पाहून हे पाप नव्हे, पुण्यच अशी माझी खात्री होत होती. खोटें हें अशा वेळेला खऱ्यापेक्षां श्रेयस्कर ठरतें. "बरंका, म्हातारबुवा, पत्ता हरवला तेव्हां तुम्हाला पोचते करण्यासाठीं त्यानें पाठविलेले दहा रुपये मला कसे अन् कुणाला द्यावे याची पंचाइत झाली होती. पण योगायोग म्हणतात तो याला! तुम्ही अनायासे भेटलांत बरे झालें, आतां तुमचं कार्ड पाठवण्याची गरजच उरली नाहीं. हे पैसे नीट ठेवा अन् मी टांगा करून देतों त्यांतून घरीं जा नीट! खरं तर या वयांत तुम्ही मुलाजवळच असलेलं बरं. मी मुंबअीला गेल्यावर दगडूला सांगतो अन् दोन दिवसांची रजा देऊन तुम्हाला घेऊन यायला इकडे पाठवतों. आमच्या बंगल्याच्या आवारांत मोटारशेजारच्या खोलींतच त्याला जागा दिली आहे. तुमचीही व्यवस्था होईल तिथेच."

या साऱ्या अनपेक्षित प्रसंगानें तो म्हातारा इतका भांबावला "कीं पांडुरंगा...पांडुरंगा..." याशिवाय त्याच्या तोंडून शब्दच फुटत नव्हते. त्याच्या मुंडाशाच्या पदरांत रुपये बांधून देऊन, टांग्यांत बसवून मी माझ्या अशीलाच्या घराकडे वळलों.

माझ्या डोळ्यापुढें त्या म्हाताऱ्याच्या जागीं माझ्या वृद्ध दिवंगत पित्याची मूर्तीच दिसत होती. ऐन तारुण्याच्या गुर्मीत हेकेखोरपणानें आणि अविचारानें मी त्यांची केलेली अनास्था, आणि त्यांतच घडलेला त्यांचा मृत्यु या घटना अनेक वर्षे झालीं तरी शल्याप्रमाणें माझ्या हृदयांत सलत होत्या.

म्हाताऱ्याचा टांगा दिसेनासा झाला, आणि इतक्या वर्षांची मनांतली सतत टोंचणी एकाएकीं नाहीशीं झाल्यासारखें मला वाटूं लागलें!

[१९४३.]

## मंगलभुवन (८)

..." बघून घ्या नीट. अशी आहे आमची सारी व्यवस्था. सारी जय्यत तयारी. फक्त तुमचीं माणसं अन् पैसा अेवढंच हवं, बाकी सारं आमच्याकडे लागलं. खरं म्हणजे या दोन्हींपैकीदेखील नुसता पैसा आणलांत तरी पुरे. गेल्या वर्षीच किनअी असाच अेक मुलगा आला होता अिकडे परदेशांतून पैसा कमावून. अेकटा पोरका जीव. योग्य कमिशन घेऊन आम्हींच त्याचं लग्न जुळवून दिलं अन् वऱ्हाडासाठी कुणी नातेवाअीक, अिष्टमित्र नसल्यानं आमच्याच नात्याचीं सारीं माणसं घेतलीं बोलावून अन् थाटलं त्याचं वऱ्हाड. सारा मंडप जसा काय माणसांनी फुलून गेला होता महाराजा ! सुखानं करताहेत संसार बिचारे. असं आहे म्हणून तर आमच्या पुण्यात अितकीं लग्नं झडताहेत. किती दूरदूरचे वऱ्हाड, नागपूर, खानदेश, गुजरातकडचे लोक आपल्याअिकडे येऊन आरामांत कार्य उरकून परत जातात. सगळीं कंत्राटं घेतों आम्हीच. वाजंत्रीं, फुलं, जेवणं, बत्या, मोटार, भटजी– सारं आमच्याकडे लागलं. कोष्टकाप्रमाणं पैसा मोजा म्हणजे झालं. अशी व्यवस्था आहे महाराजा ! "

मंगलभुवनाचे मालक बंडोपंत कुरकुरे आपल्या फुगीर पोटावरून हात फिरवीत, अिंदूरकडच्या पाहुण्यांना आपल्याकडील सर्व व्यवस्था समजावून देत होते. आपल्यामागची अनोळखी शहरांत पायपीट करण्याची दगदग वांचली म्हणून भय्यासाहेब उंटवाले, अिंदोरकरहि खुशींत आले होते. शेवटीं ते म्हणाले, " ठीक आहे भय्या. पसंत आहे आम्हाला तुमची व्यवस्था. परवापासून चारपांच दिवस आमच्या नांवानं ठेवा तुमचं भुवन. काय किराया ( भाडें ) होतो तो कळवा मागून. "

"छे! छे! छे!" हवेंत एकदम हात उडवून बंडोपंत उद्गारले, 'बिलं अन् आकार अन् किराया काय तुम्ही म्हणतां तसली भानगड ठेवलीच नाहीं आम्हीं. सारे पैसे अँगाउ! अहो, चांगल्या सभ्य मवाल्यांशीं आमची कितीकदा गाठ पडली आहे. अशी टोपी बसलीय् महाराजा! तेव्हापासून कानाला खडा, की सारा आकार आगाउ आल्याशिवाय कुणाला भुवनांत पाय टाकू द्यायचा नाही! होऽऽ, जो आधी पैसे देअील त्याचा क्लेम! बरं म्हणा, वाअीट म्हणा! आमचा असा खाक्या आहे महाराजा! पटलं तर आता पावती फाडतों. बाकी कुठंहि गेलांत तरी आमच्यासारखं सोयिस्कर मंगल-भुवन मिळायचं नाही हें समजून राहा महाराजा!"

या अघळपघळ पुणेरी वक्तृत्वाने गुदमरलेले श्रीयुत उंटवाले शेवटीं जरा त्रासूनच म्हणाले, "अरे भैया! हें सब ठीक आहे. पण किराया काय त्याची बात काय काढा की आधी."

"अंऽ! त्यांत काय महाराजा? आपल्यासारख्या लोकांना काय जड वाटणार आहे? आमचे दर अगदीं माफक आहेत. रोजचे वीस रुपये दुसरीकडे गेलांत तर पंचविसाखाली बोलायचे नाहींत. तुम्ही इतक्या दूरचे–तुमच्या इंदुरापर्यंत आमच्या मंगलभुवनाचा लौकिक पसरावा, तिकडची आणखी मंडळी आमच्याच भुवनांत उतरावी म्हणून ही सवलत देतोंय् महाराजा! अर्थात् इलेक्ट्रिक चार्जेस, पाट, भांडीं वगैरे निराळें!

"आणखी हें बघा, आमच्या भुवनांत होणारे समारंभ अगदीं राजशाही थाटाचे झाले पाहिजेत. डोळे दिपले पाहिजेत साऱ्यांचे अशी व्यवस्था असते आमची. त्याच्यासाठीं खुद्द आमच्या घरचा साऱ्या चांदीच्या भांड्यांचा सेट आम्ही चांगलीं माणसं पाहून देतों एक्स्ट्रा चार्जशिवाय, बरं का महा-राजा! चांदीचीं दोन ताटं, दोन तबकं, अत्तरदाणी, गुलाबदाणी, दहा वाट्या, अगदीं जाड, पेशवाई थाटाचा चोख चांदीचा संच आहे. हज्जार रुपये मोजलेत महाराजा. घ्या नीट मोजून. इतकी सवलत असल्यावर मग तर आमचे चार्जेस नाहीं ना वाटत भारी?"

समोर मांडून ठेवलेल्या जाड, घसघशीत, लखलखीत चांदीच्या भांड्यांकडे पाहून शेवटीं ऊंटवाल्यांनी आपला निश्चय केला. अिंदोरहून त्यांच्या कांहीं स्नेह्यांनी पत्रें दिलीं होतीं. तीं घेऊन पुण्यांतल्या कांहीं लोकांकडून चांदीचीं भांडीं उसनीं आणणार होते ते; तें या सवलतीमुळे टळलें म्हणून त्यांनाहि हायसें वाटलें. शंभराच्या नोटा काढून त्यांनी बंडोपंतांपुढे ठेवल्या आणि म्हणाले, ‘ बडी मुष्कील आहे भैय्या ! गळयापर्यंत डुबून गेलों आहे या खर्चांत. आमच्या अिंदोरमध्ये तुकोगंजांत नाहीतर स्नेहलतागंजांत याच्या अर्ध्या रकमेंत शानदार समारंभ उडवून देतों म्हटलं; पण मुलाकडलीं माणसंच अैकत नाहीं भैय्या ! बडी आफत ! अिंदोरहून अितक्या लांब मजल मारावी लागली, कोणाची पहिचान नाहीं अिथं. ’

‘ अगदी निश्चिंत राहा भय्यासाहेब ! ’ नोटा तीनतीनदा मोजून खिशांत घालीत बंडोपंत म्हणाले, ‘ सगळी व्यवस्था माझ्याकडे लागली महाराजा ! आमच्या घरांतली विश्वासाची मोलकरीणहि देतों तुम्हाला. झाडलोट, भांडीं, कपडे, निवडणं, सारं करायला बाया घेऊन येअील ती—कांहीं काळजी करूं नका महाराजा ! तुमच्याकडच्या बायकांना मिरवण्यापलीकडे कांहींएक त्रास नाहीं. उगीच नाही आमच्या पुण्याचा लौकिक लग्नासाठी ! जातांना पाहाल ! ’

‘ मेहेरबानी आहे भैय्या ! ’ म्हणून उंटवाले उठले.

बंडोपंतांनीं दिलेला शब्द मात्र बरोबर पाळला. आचारी, पाणके, वाढपी, बँडवाले, दिवेवाले, खटपटे, फुलवाले, मोटारवाले फर्निचरवाले—सारे लोक संध्याकाळच्या आंत येऊन सुपारी घेऊन गेले. मात्र त्यांत बंडोपंतांचें कमिशन असेल याची शंकाहि भैय्यासाहेब उंटवाल्यांना आली नाहीं.

लग्न सुरळीत आटपलें. सुरळीत म्हणजे त्यांतलीं रुसणीं-फुगणीं-शिव्याशाप सारे विधीहि धार्मिक विधींच्या बरोबरीच्या उत्साहाने पार पडले.

मांडवपरतणें झालें—सूप वाजलें. जमलेले वऱ्हाडी घरोघर निघून गेले. पाठराखणीसह वधूहि नारायण पेठेंतल्या सासऱ्याच्या वाड्यांत पोचली.

भैय्यासाहेबांनीं सारीं बिलें भागविलीं. सामानाची आवराआवर केली. बंडोपंतांकडे जाऊन अिलेक्ट्रिकचें बिल द्यावें आणि त्यांचीं चांदीचीं भांडीं पोचतीं करावीं एवढेंच काम उरलें.

मोजदाद केली तों एक ताट आणि पांच वाट्या नाहींशा झालेल्या दिसल्या! सारा समारंभ आटेपपर्यंत रोज रात्रीं स्वतः मोजून ठेवलेल्या या ताटवाट्या अेकाअेकी कशा नाहींशा झाल्या याचें भैय्यासाहेबांना कोडेंच पडलें. त्या कुठेंहि सांपडेनात. वऱ्हाडांतल्या कुणीं माणसांनी तर...?

सगळीकडे शोधाशोध- गोंधळ!

दुपारीं कपाळाला हात लावून बसलेले भय्यासाहेब उंटवाले सदाशिवरावांना ही कहाणी सांगत होते. अनोळखी पुण्यांत एका अिलेक्ट्रिक वर्कशॉप आणि दुकानांत या सदाशिवरावांची व त्यांची भेट झाली ती मंडपासाठी भाड्यानें जादा बल्ब आणण्यासाठीं भय्यासाहेब गेले असतां.

सदाशिवरावांनी पुण्यांत अिलेक्ट्रिक वर्कशॉप आणि दिवे-उपकरणांचें दुकान काढलें होतें. भय्यासाहेबांची आणि त्यांची अिंदूरची ओळख. त्यांच्या घरीं एक वेळ जेवून सदाशिवनें शिक्षण पुरें केलें होतें. कांहीं आकार न घेतां सदाशिवने सारे दिवे त्यांना दिले—स्वतः फिटिंग करून दिले. ते काढून नेण्यासाटी आणि भय्यासाहेबांचा निरोप घेण्यासाठी ते आता मंगलभुवनांत आले होते.

भय्यासाहेब त्यांना आपली कहाणी सांगत होते, 'बडी आफत आली आहे भैया! आणलेले पैसे खलास व्हायला आले. सिर्फ रेलच्या किरायापुरते रुपैये आहेत. मीं म्हटलं साऱ्यांचीं बिलं चुकतीं केलीं; आतां रात्रीच्या गाडीनं कूच करून एकदा अिंदोरांत जुना तोफखाना रोडवर आपल्या घरांत जाऊन पोचलों म्हणजे मिळवली! पण अिथंच हा मामला उभा राहिलाय्. कमसे कम दोनशेंचा फटका बसणार! अरे मींच पाहिलं तें ताट-वजनदार अन् जाड. पेशवाअी वाट्या; वजन लिहून ठेवलं असेल त्या मालकानं. कुठून उगीच रुबाब दाखवायला परक्याचीं चांदीचीं भांडीं घेतलीं असं झालंय्!'

"नांव काय आहे मालकाचं म्हणालांत?" सदाशिवनें विचारलें.

"अरे कोण बंडोपंत कुरकुरे आहे या मंगलभुवनाचा मालक— बडा काफर अन् कंजूष अवलाद आहे. आता या नवख्या शहरांत ही धिंड! ह्याच्यां-कडे पदर पसरावा लागणार कीं काय उसनवारीसाठी! भैया, भेजाचे तुकडे पडताहेत नुसते!"

सदाशिवने सारे बल्ब गोळा करुन खणाखणांच्या डब्यांत भरुन ठेवले. तो म्हणाला. " भय्यासाहेब, जरा शांत व्हा. आपण स्वस्थपणानं बोलूंया. याचा नीट छडा लावूं आपण. या गृहस्थाचं नांव अैकलंय मी. पाहिलंदेखील आहे त्याला. त्याच्या व्यवहाराची कुणकुण आहे मला. आंत चला जरा. तपास न लागला तर पैसे द्यायचे आहेतच. ते कुठं चुकताहेत?"

संध्याकाळीं भैय्यासाहेब बंडोपंतांच्या माडीवर गेले. अिलेक्ट्रिकचे पैसे त्यांनी पुढं ठेवले आणि भांडीं मोजलीं. ते म्हणाले, "अेक ताट और पांच वाट्या काल नाहींशा झाल्यात अेकाअेकी भैया!"

बंडोपंतांनी अेकदम बैठकीवरुन उडी मारली, "बापरे! मोठं ताट अन् पांच वाट्या गेल्या? म्हणतां तरी काय? अितक्या विश्वासानं तुमच्या स्वाधीन केलीं घरांतलीं चांदीचीं भांडी. दोनशे तोळ्यांचं ताट अन् पंधरापंधरा तोळ्यांच्या घसघशीत वाट्या— अहो जिवापलीकडे जपून ठेवल्या होत्या त्या महाराजा! पांचशेचा माल आहे आजच्या बाजारभावानं. तुम्हीं पावती दिलीत त्यांत चक्क वजन-मार सारं लिहिलं आहे गैरसमज नको म्हणून. फार वाअीट झालं. वाअीट वाटतं अेवढी रक्कम मागायला तुमच्यासारख्या माणसाकडून. पण मी तरी काय करणार महाराजा? पण अेवढं करतों मी. पांचशे जाऊं द्या, चारशे द्या म्हणजे झालं. परमुलुखांतलीं तुम्ही माणसं—पुण्याचं नांव वाअीट करायचे उगीच. रोख नसले तर चेक दिला तरी चालेल. आपल्यासारख्या-कडून खोट्या चेकची लबाडी व्हायची नाहीं ही खात्री आहे माझी.'

भैय्यासाहेब घुटमळत म्हणाले, 'हें बघा भैय्या, मला संशय येतो आहे त्या मोलकरणीचा. तिनंच उधरअिधर गफलत केली असली पाहिजे

कुट. तुमच्या कोतवालींत वर्दी देतों—काय फरासखाना म्हणतां ना तुम्ही त्याला ? और पोलिसचा जरा दंडा दाखविला म्हणजे साफ साफ कबूल होईल बांदी (गुलाम). '

अेकदम पिसाळून बंडोपंत ओरडले, " आमच्या मोलकरणीचं नांव घेण्याचं काम नाही भैय्यासाहेब. गेलीं दहा वर्षे काम करते ती आमच्याकडे. कधी काडी झाली नाही अिकडची तिकडं. पोलिसांकडे नांव देऊन अिची अब्रु खराब करतां ? तुमचं अिंदोर नाही लागून गेलं अिथं हवं त्याला कोतवालींत खेचून दंडा दाखवायला ! हां, सांगून ठेवतों महाराजा ! तीच खाडकन् फिर्याद ठोकील तुमच्यावर खोटा आळ घेतल्याबद्दल. अन् मी साक्ष देअीन तिच्या बाजूनं. म्हणून म्हणतों महाराजा, मुकाट्यानं चारशे रुपये ठेवा अिथं नि मग जा खुशाल अिंदोरला नाहींतर मंदोरला. पैसे मिळेपर्यंत सामान नाहीं हलवूं देणार अिकडून. आम्ही पुण्याचे लोक असेतसे फसणार नाहीं म्हटलं महाराजा ! "

" ठीक आहे भैय्या— करतां काय ? ' वखत पडे बाका तो गद्धेको कहेना काका ' अशी म्हण आहे आमच्या अिंदोरकडे. करा पावती. अिंदोर माळवा सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकवर चेक देतों तुम्हाला ! " म्हणून भय्यासाहेबांनी चेकबुक काढून बंडोपंतांच्या नांवाने चेक लिहून त्यांच्यापुढें टाकला.

चेक हातांत पडल्यावर बंडोपंत खूप खुलले. ' अरे, दोन कप चहा ठेवा रे ' म्हणून त्यांनीं समोरच्या भिंतीला उद्देशून हुकूम सोडला. हरवलेल्या ताटवाट्यांचें वजन घाट, मजुरी, तयार केल्याची तारीख वगैरे सर्व माहिती लिहून, किंमत भरून पावलों म्हणून पावती लिहिली. त्यांचें मांजरासारखे हिरवट डोळे विजयानंदाने लखलखत होते. ' घ्या महाराजा , म्हणून पावती टाकून आपला आनंद दाबण्यासाठी त्यांनी अैसपैस आळस दिला आणि भिंतीकडे तोंड वळवलें.

ती पावती नीट वाचून भैय्यासाहेबांनी कोटाच्या आंतल्या खिशांत ठेवली. नीट सरसावून त्यांनी बंडोपंतांच्या मांडीवर अेक थाप मारली अन् ते म्हणाले—

" भैय्या ! कधी कलाकंद खाल्ला आहे तुम्हीं ? फिक्या माव्याच्या बर्फीला कलाकंद म्हणतात आमच्याकडे. गोळा उचलावा अन् गपकन् तोंडांत घालावा– लागलीच विरघळावा तोडांत ! "

" आँ ? कलाकंद ? नाहीं बुवा ! पण बर्फी खूप खाल्ली आहे महाराजा. "

" अस्सं. मग अेखाद्याचे चारशे रुपये गपकन खातांना कलाकंदाचा गोळा खाल्ल्यासारखं वाटत असेल नाही, भैय्या ? "

" काय बोलतांयू हें तुम्ही ? " जरा सावरून बंडोपंतांनी संशयाने प्रश्न केला.

भैय्यासाहेब संथपणाने म्हणाले, " देख भैय्या ! तूं पुण्याचा असलास तर मी आडदांड अिंदूरचा आहे हें विसरूं नकोस. बचा ! चक्क पितळेच्या ताट अन् वाट्यांना चांदीचं गिलीट करून तीं भांडीं चोख चांदीचीं म्हणून मला दिलींस. आपल्याच मोलकरणीकडून चोरून, स्वतःच्या घरांत भरून माझ्याकडून सारे पैसे चोपून घेण्याची कोशीस केलीस. परमुलुखांतला अन् अनोळखी म्हणून डाकूगिरी केलीस, पण साधली नाहीं भैय्या ! "

बंडोपंतांचा चेहरा हिरवा-निळा होऊं पाहात होता. बोबडी वळूनहि ते दमदाटी करण्याचा यत्न करीत होते, " का...काय म्हणतां तुम्ही ? कोण म्हणतं भांडीं गिलिटाचीं होतीं ? वजन-भार-मजुरी सारं टिपून ठेवलय मीं. भांडीं हरवून वर मखलाशीं करतोस, चोर..." बोलतांबोलतां ते एकेरीवर आले.

" अैसा ! शिवीगाळ करायची नाहींतर मारामारी करायची इच्छा असली तरीहि आम्ही हटायचे नाहीं. समजून राहा भैय्या. लडके पणापासून रबडी ( बासुंदी ) खिलवली आहे आम्हाला वडिलांनी ! अन् रामशरण चौबेच्या अंगावर कुस्ती खेळलोंय मी भैय्या. होऊन जाऊं देत हवं तर ! पण इतर गोष्टी कशाला हव्यात ? माझा पुरावाच दाखवतो तुला. "

म्हणून भैय्यासाहेबांनी खिशांतून एक पावतीचा कागद काढला. सदाशिवरावांच्या अिलेक्ट्रिक वर्कशॉपची पावती होती ती.

" हं बोल आता भैय्या ! जर तुझ्या ताटवाट्या गिलिटाच्या नसून चोख चांदीच्या निराळ्याच आहेत असं म्हटलंस, तर त्याचं दुसरं बिल बताव ! चल, कर जलदी ! "

दोन पितळी ताटं शंभर तोळे भार व दहा पितळी वाट्या प्रत्येकीं पंधरा तोळे भार यांवर अिलेक्ट्रोप्लेटने चांदीचें गिलीट करून घेतलें त्याबद्दल बंडोपंताने दिलेल्या पैशाची पावती होती ती.

भैय्यासाहेबांची गिलिटाची पावती पाहून बंडोपंतांचें तोंड फटफटीत पडलें ! खिशांत घातलेला चेक मुकाट्याने काढून त्यांनी भैय्यासाहेबांपुढे टाकला. आवंढा गिळून, हसूं तोंडावर आणीत ते म्हणाले, " वा ! वा ! म्हणजे खरं समजलांत की काय ? जाऊंद्या ! उगीच थट्टा केली तुमची. अहो, उगीच व्यवहार म्हणून चार जिनसा ठेवल्यात जवळ चांदीच्या गिलीटाच्या जाउं द्या गेल्यात तर ! ते पैसेहि सोडून देतों हवं तर ! " शेवटीं गयावया करण्याचा आविर्भाव त्यांच्या शब्दांतून आला.

चेक् खिशांत घालीत भैय्यासाहेब म्हणाले, " हें पाहा बंडोभैय्या ! आमच्या अिंदोरकडे कुस्ती खेळतांना एक पेच घालतात– त्याचं नांव 'धोबी पछाड !' धोबी कपडे धुतो त्याप्रमाणें सामनेवाल्याला डोक्यावर उचलून चीत मारायचा असतो भैय्या. सरळ पाठ टेकवली तर ठीक. पण मधेच थांबलं, अवसान गेलं, तर सामनेवाला आपल्या गळ्यांतच पाय अडकवून अैसा 'खोडा' घालतो, कीं रक्तच ओकवतो ! तसं आता झालंय् भैय्या. असं अधेमधे सोडणार नाहीं तुला. आता चांगला उचलला आहे तुला वर. अिंदोरकडे मुनसिफ् आहे मी. कायदा कळतो मला भैय्या. पितळी माल चांदीचा सांगून पैसे उपटण्याची कोशिस करणं हा बडा फौजदारी गुन्हा होतो. त्याला कमसे कम दोन वरस सक्त मजुरीची सजा आहे भैय्या, समजलास ? बोल आतां. ले जाऊं तुला कोतवालींत ? आणखी पंधरा मिनिटांनी सदाशिव अिलेक्ट्रिकवाला येणार आहे अिथं. त्याची साक्ष पुरे. अन् कोतवालीची झडती आता घेववतों. सारा माल तुझ्याच घरांत छपवून

ठेवला आहेस तो काढतों अन् करतों हजर. ‘दंडाबेडीचा’ मामला है भैय्या!”

आता बंडोपंत कुरकुऱ्यांच्या अंगाला घाम फुटला. तोंडावर हिरव्या-पिवळ्या रेषा दिसूं लागल्या. धडपडत उठून त्यांनी भैय्यासाहेबांच्या ‘किरा-या’च्या शंभराच्या नोटा काढून त्यांच्यापुढे टाकल्या आणि साष्टांग नमस्कार घातला. “गुरु भेटलांत महाराजा! आजवर या बंडोपंताला कुणीं अितकं पेचांत धरलं नव्हतं. मी गाय आहें आता तुमच्यापुढं...तुमचे भाड्याचे पैसेहि घ्या परत अन् तोंड बंद ठेऊन एकदाचे जा परत इंदूरला. शपथ घेऊन सांगतों, आता नाहीं पुन्हा कुणाला फसवायचा!”

“अच्छा जा भैय्या! मला तरी कोतवालीच्या मामल्यांत चक्कर घालायला कुठं टाअिम आहे? लेकिन याद राखून ठेव! हा आमचा सदाशिव आहे अिकडे पुण्यांत. त्याच्याकडून जर मला कळलं, की पुन्हा कुणाशीं असा गळेपडूपणा केलास तूं, तर याद राख! सरळ फिर्याद ठोकीन मी. फौजदारी गुन्ह्याचा मामला आहे हा. दहा वर्षांनी देखील काढतां येअील हा. अच्छा ठीक! तूं सरळ आहेस आता म्हणून आमंत्रण देऊन ठेवतों, इंदोरकडे आलास तर ये आमच्याकडे. जुना तोफखाना रोडवरचं भैयासाहेब उंटवाल्याचं मकाण कुणीहि दाखवील तुला. आमचा इंदोरचा कलाकंद अन् रबडी खूप खिलवूं तुला!”

हल्लीं बंडोपंत कुरकुरे यांनीं आपल्या मंगलभुवनावर एक पाटी लावली आहे—

“इंदोरच्या लोकांना जागा मिळणार नाहीं.”

(१९४४)

# दुधाची धार (९)

दूऽऽध!

भल्या पहांटेस तारस्वरांत हांक आली आणि बाहेरचें दार खडखड वाजलें. आंतल्या खोलींतून माईसाहेबांनीं तोंडावरचें पांघरूण जरा किलकिलें करून कर्कश हांक मारली, "विमे, ए विमे, कारटे! दूधवाल्याची हांक ऐकूं येत नाहीं कां? कान फुटलेत वाटतं? उठतेस कां येऊं?"

बाहेरच्या खोलींत एका घोंगडीवर पडलेली, एक सोळा सत्रा वर्षांची मुलगी दचकून उठली. तापानें तिचे डोळे लालभडक झाले होते. उभे राहिल्याबरोबर झोकांडे जात होते. भिंतीच्या आधारानें पुढें होऊन तिनें दार उघडलें आणि पातेलें दूधवाल्यापुढें ठेविलें.

भरलेलें पातेलें उचलून देतांना त्याच्या बोटांना तिच्या बोटांचा ओझ-रता स्पर्श झाला आणि निखाऱ्यासारखा चटका बसला त्याला. तिची स्थिती पाहून तो एकदम चरकला आणि म्हणाला, "बरं नाहीं दिसत तुम्हांला; ताप भरला आहे भयंकर! पडून राहला हवं अगदीं. विश्रांति—"

तापानें सुकलेले, आणि सालडीं निघालेले विमलचे ओंठ त्रागयाच्या भेसूर हास्यानें विलग झाले. ती उद्गारली, "विश्रांति? विश्रांति आतां मेल्यावर!"

तिच्या हाताच्या चटक्यापेक्षां या निराशेच्या शब्दांचा प्रखर चटका त्याला अधिक वाटला. "बरं औषधपाणी?"

इतक्यांत 'विमे, कारटे!' म्हणून माईसाहेबांची पांघरुणांतून गुरफट-लेली हांक बाहेर आली आणि त्या हांकेनेंच त्याच्या प्रश्नाला उत्तर मिळालें.

"साध्या तापाला काय करायचंय् औषध?" दारांतून मागें वळत विमल म्हणाली.

" डोकं मात्र असं दुखतंय कीं उंबऱ्यावर फोडून घ्यावंसं वाटतं !"

दूधवाला माधव जरा घोंटाळला. गेली चार वर्षं तो सबनीसांच्या घरीं दूध घालीत असे. बोलण्याचालण्याचा परिचय होताच; पण तो मामुली बाबतींत. तरीहि विमलच्या स्थितीकडे पाहून त्याला राहवेना. रेनकोटाच्या खिशांत हात घालून त्यानें एक ॲस्पिरिनचें पाकीट बाहेर काढलें आणि तो म्हणाला,

" जरा थांबा. एवढ्या दोन गोळ्या घ्या चहाबरोबर. तेव्हांच राहील डोकं. नेहमीं पावसापाण्यांत फिरावं लागतं म्हणून मी खिशांतच ठेवतों एकदोन पाकिटं. "

आंतल्या उंबरठ्यावर गेलेली विमल तिथंच थबकली. " कांही नको. वाटेल बरं आपोआप ! " ती संकोचानें म्हणाली.

" नाहीं म्हणूं नका. इतके दिवस मुकाट्यानें पाहतोंच आहे तुमचे हाल. तिसरेपणाच्या बायकोच्या खुशामतींत वडीलांना बघायला वेळ नाहीं, अन् माईसाहेबांना तर स्वतःच्या सुखाखेरीज दुसरं कांहीं दिसतच नाहीं जगांत. माणुसकी म्हणून कांहीं आहे कां नाहीं ? मी आपला असा सरळ, फटकळ कामगार गडी आहे. मनाला लागलं म्हणून बोललों. राग धरूं नका ! "

कंबरेइतक्या उंचीच्या दोन चकचकीत, कडीदार, पितळी दुधाच्या बरण्या त्यानें सहज बोटांवर उचलून सायकलच्या हँडलला लटकावून दिल्या नि गर्‌कन् सायकलवर टांग टाकून तो निघून गेला.

हातांतल्या ॲस्पिरिनच्या पाकीटाकडे विमल विस्मयानें पहातच राहिली. या दुधवाल्याशीं आपण इतकें बोललों तरी कसें, त्याला विचारपूस करूं दिली नि त्याच्याकडून गोळ्या घेतल्या कशा, याचं मात्र तिला आपण होऊन आश्चर्य वाटूं लागलं. त्याच्या साध्या माणुसकीच्या शब्दांनीं तिला कितीतरी उल्हसित झाल्यासारखं वाटूं लागलं.

दोन दिवसांच्या उपासानें विमलचा ताप आपोआप निघाला. हातीं आलेल्या गोळ्यांनीं तिची डोकेंदुखीहि थांबली. मात्र अत्यंत गळून गेल्या-

सारखें अशक्तवाणें तिला वाटत होतें. दुसऱ्या दिवशीं "दू ऽ ऽ ध !" म्हणून माधवाची हांक आली. तिनें दार उघडून भांडें पुढें ठेविलें.

श्रावणाच्या मुसळधार पावसानें रेनकोटांतूनहि आरपार हल्ला चढवून त्याला चिंब भिजवून टाकलें होतें. तोंडावर सांचलेले पाण्याचे थेंब दोन्हीं बाजूंनी ओघळत येऊन एका धारेनें हनुवटीखालीं गळत होते. त्यानें रेनकोट काढून झटकला. काच्या मारलेल्या धोतराचीं दोन पाखीं जरा वर घेऊन पिळून टाकलीं आणि रुमालानें तोंड पुशीत विचारलें, "आतां कसं आहे ? डोकं काय म्हणतंय ?"

विमल जरा हंसून म्हणाली, "बरं वाटतंय आज जरा. त्या गोळ्या घेतल्याबरोबर डोकं थांबलं काल. पण तुम्हीं किती भिजलांत हे ? सर्दी नाहीं कां व्हायची ?"

"अँ, त्यांत काय आहे ?" तो बेफिकीरीनें म्हणाला, "मला संवय झाली आहे त्याची. आजारी पडणं परवडत नाहीं आमच्या धंद्याला. सकाळीं साडेचार वाजल्यापासून सायकल पिटाळावी लागते साऱ्या शहरांतून. मग थंडी असो, नाहींतर मुसळधार पाऊस असो. आमची काळजी घ्यायला कोणाला फुरसत आहे ?"

"कां ? घरीं—" खालीं पहात, चांचरत विमल म्हणाली.

"घरीं ? घरीं आई आहे. पण तिचा फार राग आहे माझ्यावर. इंग्रजी शिक्षण अर्धवट टाकून मी ह्या दुधाच्या धंद्यांत पडलों म्हणून. बाबा वारले मग कोणीतरी धंद्याला लागायला हवंच. मी म्हटलं, कारकुनीपेक्षां हा अंगमेहनती धंदा काय वाईट आहे ? माझं शिक्षण थांबलं तरी माझ्या धाकट्या भावाचा बी. ए. पर्यंतचा शिक्षणखर्च मी करणार आहे. मॅट्रिकमध्यें आहे तो आतां !"

कुटुंबाबद्दल बोलतांना त्याचे डोळे करारीपणानें आणि स्वाभिमानानें इतके तेजस्वी दिसत होते कीं, विमलची त्यांच्यावर नजर ठरेना. जरा ओशाळून पातेलें उचलून ती चटकन् आंत निघून गेली.

बाहेरचं दार लागलं. सायकलवरील बरण्यांचा खडखडाट दूरदूर अस्पष्ट होत जात होता. शेगडी पेटवून तिनें चहाचें आधण ठेवलें. आपल्याला आज असं काय होतंय् तें तिचं तिलाच कळेना. पदरानें तीनतीनदां डोळे पुसले, तरी असे अश्रू कां भरताहेत पुन्हा डोळ्यांत, कधीं न झालेला नवा आनंद कसला होतोय, अन् उरांत एवढी जोरानें धडधड कसली होते हेंहि तिला कळेना ! पाटावर कपबशा मांडतांना माईसाहेबांच्या खोलींतल्या फोनोंतून नेहमीं घरभर घुमणाऱ्या गाण्याची लकेर तिच्या तोंडून आपोआप निघून गेली.

या हो, द्या हो, राया, करपाशीं ही काया,
रात्र पहा वायां जाई ना हो,
विरघळली कां मनींची माया ?
मंद मंद हा चांद चालला, कुठवर वाट बघूं,
कन्हैया–कुठवर वाट बघूं.....

माईसाहेबांचा चहा, दादासाहेबांची कॉफी, बंबांत विस्तव, अंगधुणं, टिन्च्या डबड्यांतल्या तुळशीला पाणी अन् प्रदक्षिणा, स्वयंपाक, जेवण, उष्टींखरकटीं, केरपोतेरं —

रोज गळ्यांत लोढणं अडकविलेल्या गायीप्रमाणें रखडत रखडत निर्जीवपणें चालणारे तिचं काम आज केव्हां अन् कसं चट्चट् उरकलं तें तिचंच तिला कळलं नाहीं. रोज सकाळीं कसंतरी वेणीचं दोरखंड गुंडाळावं, नाहींतर साऱ्या केसांना मुसळा सारखा जाड पीळ देऊन, करकचून कशीतरी अंबाड्याची गांठ मारून टाकावी. त्याचं टोंक दिवसभर बाहेर लोंबत असायचंच. पण आज मात्र तिनें आपल्या केसांचें पेड करून, नीटं विंचरून जिलबीची वेणी घातली. रोजचा प्रकार म्हणजे करंड्यांत चटकन् बोट खोंचून, कसातरी ओल्या कुंकवाचा टिळा लावायचा अन् भिंतीला बोट पुसून टाकायचं. पण आज मात्र तिनें नीट कोरून कुंकू–लावलं–नेहमींपेक्षां किंचित् लहान, अन् किंचित् खालीं.

असेच कांहीं दिवस गेले. यापूर्वींच्या काळांत पहांटें दूध घेतांना विमलचा अवतार म्हणजे मूर्तिमंत गबाळेपणाचा असे. विस्कटून तोंडावर आलेले केंस, चोळामोळा झालेलं लुगडं, फरपटलेलं कुंकू अन् झोपेंमुळं पेंगणारे डोळे. पण हल्लीं मात्र ती वेळेआधीं उठून, तोंड धूवून, वेणी घालून दारावर थाप पडण्याआधींच हंसतमुखानें दार उघडूं लागे. तिचं हें परिवर्तन माधवच्याही लक्षांत आलं आणि तिच्या हिंवतापाला त्यानें मनांतून धन्यवादच दिले !

एके दिवशीं त्यानें जरा मिस्किलपणें पूर्वींचाच प्रश्न टाकला, "आतां कसं वाटतंय ?—डोकं काय म्हणतंय ?"

"बरं आहे कीं ! तुमचा गुण —" विमलनें हंसऱ्या ठसक्यांत उत्तर दिलें. त्याबरोबरचें तिचें अस्फुट हास्य, मुरडून खालीं वळलेली मान आणि डोळ्यांत तरंगणारें नवें तेज यांकडे पाहून, न सांगतांही माधवला तिच्या भावनेची कल्पना आली. त्याबरोबरच आपल्या हृदयांतही खोल खोल, कांहीं नवीन भावना जागृत होत आहे असें त्या दिवसापासून त्याला वाटूं लागलें.

असाच एक दिवस होता. दुधाचें पातेलें उचलून नेतांना त्याचा जरा कांपरा हात तिच्या हाताला लागला. तिची बोटें त्याच्या अंजलींत सामावलीं. तिनें तीं मागें ओढून घेतलीं नाहींत. त्या मऊ आणि जराशा उष्ण बोटांच्या स्पर्शातून दोघांच्या अंगांत नवचैतन्याच्या लहरी उसळत होत्या. माधव जरा जड आवाजांत म्हणाला, " माझी पायरी तर चुकली नाहीं ना ? पांढरपेशांनीं झिडकारलेल्या धंद्यांतला मी आपला एक गरीब दूधवाला आहे."

विमल हळूंच म्हणाली, " श्रीकृष्ण देखील एक दूधवालाच होता म्हणतात !" माधव समाधानानें हंसला. बरण्या उचलीत तो म्हणाला, " असेल बुवा. पण तो माझ्यासारखा दारोदार रतीब पोहोंचवायला जात नसेल !"

सारे रतीब संपवून माधव घरीं परतला तो अगदीं खुषींत. धाकट्या भावानें भीत भीत मागितलेली संमेलनाची वर्गणी आणि ट्रिपची परवानगी त्यानें एकदम होकार म्हणून देऊन टाकली.

दुकानांत किरकोळ विक्रीसाठीं ठेवलेल्या दुधांत नेहमींप्रमाणें ठराविक प्रमाणांत मिसळावयाचें पाणी आज त्यानें टाकलें नाहीं. आदपाव किंवा छटाक दूध घेऊन जाणाऱ्या गरीब कामकऱ्यांच्या मुलांमुलींवर तो आज खेंकसला नाहीं.

दुपारची जेवणं चालली होतीं. ताटांत भातभाजी इकडेतिकडे करीत, तो कितीतरी वेळ पाटावर बसला होता. शेवटीं त्याची आई म्हणाली, " हे रे काय लक्षण तुझं ? बाळ जेवण आटपून शाळेंत गेलासुद्धां पण अजून तुझं आंब्रोण सरत नाहीं. एरव्हीं त्याच्या आधींच उठायचास अन् जायचास बाहेरच्या खोलींत पांढरी विडी फुंकायला. आज झालंय काय अन्नाला ! माझं म्हातारीचं जेवण चांगलं लागत नसेल तर एखादी बायको तरी आण बघून, केव्हांची ओरडतेय कानींकपाळीं. आतां म्हातारपणीं तरी जरा विसांवा घेऊं दे कीं हातापायांना ! बाळसुद्धां थोर व्हायला आला, आतां तूंच जर असा लिंबाजीबुवा होऊन बसलास, तर त्याचं तरी कसं व्हायचं लग्न ? "

इतक्या दिवसांत आजच माधवाच्या बोलण्यांत जरा अनुकूल सूर आला. तो म्हणाला, " एवढी घाई असली सून आणायची, तर तुलाच पुढाकार घेतला पाहिजे. बघ, सांगितलं म्हणजे मागं पाय घेशील ! " हे अर्धवट अनुकूल उत्तर ऐकून त्या माऊलीला किती आनंद झाला ! भाकरीची परात एकदम लोटून, त्या माधवजवळ जाऊन बसल्या आणि म्हणाल्या, " आतां कसं ठीक बोललास बाबा ! श्रीमंताच्या पोरी नाहीं मिळाल्या तरी आपल्या तोलाच्या कितीतरी मुली आहेत माझ्या ध्यानांत. ती साने कारकुनांची कमल, गणपतराव मास्तराची सुधा, कशा नक्षत्रासारख्या पोरी आहेत. परवां देवळांत पोथी आटपल्यावर त्या भिकंभटाच्या बायकोनं तर माझ्यापुढें अगदीं पदर पसरला, 'कसंहीं करा, पण माझ्या मनकरणिकेला सून करून घ्या म्हणून !' आईचं बोलणं मध्येंच अडवीत माधव म्हणाला,

" जरा ऐकून तरीं घे ग माझं, आई ! अन् हे बघ, रतीबाच्या गिऱ्हाईकां सारखी पोरींची यादी वाचूं नकोस माझ्यासमोर. पलीकडच्या आळीच्या टोंकाशीं ते सबनीस आहेत ना, त्यांची मुलगी विमल, ती हवी आहे मला. तिथं करायची असेल ती खटपट कर ! "

" हा मेल्यांनों ! " एक प्रेमळ शिवी हांसडून, भाताचं पातेलं आपटीत माधवाची आई म्हणाली, " काय पाताळयंत्री आजची कारटीं असतात तरी ? कोण सबनीस हा ? तो चाळीशी उलटलेला, अन् तिसऱ्यांदा बाशिंग बांधलेला तो कां ? त्याच्या पोरीवर कां तुझं लक्ष आहे ? पोर बरीक चांगली गोरीभुरकी आहे हो ! पण ती गजघंटा सावत्र आई आहे ना घरांत ! अगदीं छळायला बसली आहे पोरीला. मला नाहीं वाटत, सुखासुखी ती जमूं देईल असं. लग्न झालं तर चोवीस तास बटकीसारखी राबणारी पोर जाईल घरांतून अन् सारंच स्वतःला करावं लागेल म्हणून सारखं लग्नाचं टाळतेय ती. साधीं वाणं द्यायची असली तरी मोलकरणीसारखं तबक आपलं सावत्र पोरीच्या हातांत, अन् या बाईसाहेब मात्र डोक्यावरून जरीचा पदर घेऊन ठुमक् ठुमक करीत पुढें चालायच्या ! "

" कांहीं असलं तरी आपल्याकडून होईल तें पाहावं ! " माधव म्हणाला.

" बरं बाबा, उद्या सांगतें नारायणभाऊजींना चौकशी करायला. त्यांच्याबरोबर तूंही जा हवं तर. तो सबनीस आहे ढिला अन् बाइलबुद्धया. पण हाडानं बरा असावा असं वाटतं. बघावं खडा टाकून. पण तिथं न जमलं तर मात्र ती मनकर्णिका—"

दुसऱ्या दिवशीं काडीनें औषध लावणारे माधवचे काका थोडक्यांत फुकटचें श्रेय घ्यायला पगडी घालून तयार झाले. आणि माधवबरोबर सबनीसांच्या घरीं गेले. ' या बसा, कोण ? कुठले ? ' वगैरे प्रश्नोत्तरें झाल्यावर नारायणरावांनीं मुख्य गोष्ट काढली. गणगोत्र पाहिलं ते जुळतय्, हुंड्यापांड्याची अट नाहीं, मुलगीहि पसंत आहे; फक्त तुमची संमति पाहिजे हें

ऐकून दादासाहेब एकदम् खुलले. मुलीच्या लग्नाचा प्रश्न बिनत्रासानें, बिन-खर्चानें सुटत असलेला पाहून त्यांना आनंद झाला. ते म्हणाले, " अवश्य, अवश्य ! योगायोग असला तर क्षणांत जमून जाईल सोयरीक. बरं काय करीत असतात हे ? "

" पलीकडच्या आळींतली " मुरलीधर डेअरी " यांच्या मालकीची आहे. अहो, आपल्याकडे येणारं दूध हेच घेऊन येतात कीं ! दररोज पहातच आहेत हे आपली मुलगी. त्यांना पसंतच आहे ती अन् मला वाटतं मुलीलाही पसंत आहेत हे. आपण नुसती संमत्ति द्यायची. "

हे शब्द ऐकल्याबरोबर दाराआड उभ्या असलेल्या माईसाहेब एकदम फणकाऱ्यानें बाहेरच्या बैठकींत आल्या. रागानें त्यांचा काळा चेहरा अंजिरी रंगाचा झाला होता. त्या गर्जल्या, " काय बाई रीत तरी ! दारोदार रतीब घालणाऱ्या गवळ्याच्या गळ्यांत बांधण्याइतकी कांहीं आमची मुलगी आम्हांला जड नाहीं झाली ! मघापासून आठवतें कीं, यांचा चेहरा पाहिल्यागत वाटतो. आतां रुमाल बांधल्यानं लगलीच ओळखलं नाहीं एवढंच. काय बाई धारिष्ट ! कुळवाड्यासारखं दारोदार भटकून दूध घालणाऱ्यानं आज पोरीला मागणी घातली, उद्यां एकादा भाजीविक्या नाहीतर कल्हईवाला येऊन मागणी घालायचा ! "

माईसाहेबांच्या बेफाम बोलण्यानें बिचारे दादासाहेब अगदीं ओशाळले. गोरेमोरे होऊन तोंडावरून रुमाल फिरवीत ते हळूंच म्हणाले, " अग, अग, भलतंसलतं काय बोलतीस असं ? जुळत नसेल तर नाहीं म्हणावं पण असं तोडून काय बोलावं माणसाला ? अन् कष्ट करण्यांत कमीपणा कसला आलाय ? हल्लीं मिळतात कुठें नोकऱ्या खुर्चीवर बसायच्या ? "

" तें कांऽहीं नाऽहीं ! सावत्र असलें तरी आई आहे म्हटलं मी ! साफ सांगतें असल्या जागीं माझ्या पोरीला द्यायची नाहीं ! "

टोपी काढून ठेऊन, आपल्या टकलावरचा घाम निपटीत दादासाहेब मुकाट्यानें हा भडीमार ऐकत होते. अस्सल अठीवऱ्याचे नाकांतले कोंकणस्थी

हेल काढून आणि कंबरेवर हात देऊन माईसाहेब गर्जत होत्या, " असं कधीं व्हाचं नाहीं—हें लग्न कराचं नाहीं अन् आतां पुढं एक अक्षर बोलाचं नाहीं ! "

शेवटीं दादासाहेब आपल्या कुटुंबाला आवरण्याला असमर्थ आहेत हें पाहून नारायणराव आणि माधव मुकाट्यानें उठले आणि त्यांच्या घराच्या बाहेर पडले.

आंत माईसाहेबांच्या अंगाची लाहीलाही होत होती. हें स्थळ विमलच्या मनांत भरलं. रोजच्या भेटण्याबोलण्यानं तिचं प्रेमहि बसलं असेल तर या घरीं पडून ती सुखी होणार ! आपल्या वयस्कर पतीचा रुक्ष निरुत्साही संसार, आणि त्यावर टिच्चून, आपल्याच वयाची ही सवतीची कारटी सुखी होणार म्हणजे काय ! शिवाय ती गेल्यावर घरांत अष्टौप्रहर मोलकरणीसारखं राबणार कोण ? चेपलेल्या स्वार्थानें आणि ईर्षेनें त्यांचा भडका उडाला होता.

पाहुणे जाऊन बाहेरचं दार लागल्याबरोबर त्या एकदम कडाडल्या, " दम धर कारटे, आतां असे रंगढंग करण्यापावत मजल गेली कां तुझी ? " म्हणून हातीं आली ती एक लोखंडी पळी संतापानें त्यांनीं विमलच्या अंगावर फेकून मारली. तिच्या हातांतल्या बांगडीवर ती बसून, तिची कांच लागून भळभळ रक्त वाहूं लागलें आणि भोंवळ येऊन विमल दाराला टेंकली. माई-साहेब आतां अगदीं शिवीगाळीवर आल्या, " मेली, वेसवा, कळवंतीण तरी कां नाहीं झालीस असं करायला ? तरी मला कळेना कीं, अलीकडे असे नायकीणीसारखे केंस करून, टिकली लावून पहांटे कां उभी असते दाराशीं, दूध घ्यायला. जळलं तुझं तोंड सटवे ! "

* * *

दुसऱ्या दिवशींही भल्या पहांटेस ' दूध ' म्हणून तारस्वराची हांक आली. विमलनें बाहेर जाऊन खिन्नपणें पातेलें खालीं ठेवलें. आज माधवाच्या ऐवजीं एक जख्ख म्हातारी दूध घालीत होती. भरपूर पाणी मिसळलेलें, मापाला

टीचभर कमी असे दूध घालून, जमिनीवरच दूर पातेलें लोटून ती निघून गेली. विमल खिन्नपणें त्या पातेल्याकडे पहात उभी होती.

—असेच दिवस चालले होते.

आतां घरोघर गणपती बसले होते. दादासाहेबांनींहि एका कोनाड्याला मखर लावून, त्यांत गणपतीची स्थापना केली होती. स्वैंपाक घरांत विमल मोदक करीत होती. आंतल्या खोलींत रिकामटेकड्या माईसाहेब फोनोसमोर बसून, त्यांच्या आवडत्या रेकॉर्डच्या गाण्याबरोबर माना डोलावून, स्वतःही हेल काढीत होत्या,

**या हो ऽऽ–घ्या हो राया ! करपाशीं हीं काया !**
**रात्र पहा वायां जाई, विरघळली कां मनिंचीं माया !**

टिप्...टिप्......मंद पावसांत गळणाऱ्या पागोळीप्रमाणें विमलच्या डोळ्यांतून अश्रु झिरपत होते. थरथरणारा खालचा ओंठ दातानें दाबून ती आपला आवेग गिळून टाकीत होती. प्लेट संपल्यावर साऊंडबॉक्स उचलून ठेवण्याच्या काळांत उचकीबरोबर आलेला विमलचा अर्धवट दाबलेला हुंदका माईसाहेबांच्या कानावर गेला. हातांतली पिनांची डबी त्यांनीं तशींच तिरीमिरीनें विमलच्या अंगावर फेंकली. साऱ्या खोलीभर पिनाच पिना झाल्या. —त्या जणुं माईसाहेबांच्या शब्दांच्या तीक्ष्ण मूर्तीच !

पाय आपटीत, आंत येऊन त्यांनीं कान धरून तिला पाटावरून उठवलं, “ कारटे ! सणासुदीच्या दिवशीं रडाला काय झालं ? कधीं नीट मनानं हरताळका पुजल्या नसशील तूं—त्यांनं नवरा मिळत नाहीं चांगला. आम्हीं काय करावं त्याला ? काय मेल्यांची रीत तरी ? त्या दुधवाल्याची आठवण होऊन कां निघतंय् डोळ्यातलं पाणी ? ऊठ सटवे, मीच करते मोदक. असं रडून भेकून केलेलं देवाला नाहीं चालावं कधीं ! ”

दुसऱ्या दिवसापासून दर रात्रीं शहरांत मेळ्यांचा धुडगूस सुरू झाला. माईसाहेबांना मेळ्यांची फार आवड ! त्यांचं लांब बाह्याचं गरम पोलकं, अन् शाल नेण्यासाठीं त्यांच्याबरोबर मंडपामंडपांतून विमलचीही धिंडका निघे.

अशांतच माईसाहेब एका मोठ्या मंडपाशीं आल्या. मध्यें एक बांबू घालून स्त्री–पुरुषांच्या जागा नेमून दिल्या होत्या. त्या आल्या आणि बिनदिक्कत बायकांच्या गर्दीत शिरल्या. पोरीसोरींचे खवाटे दूर करीत, पोक्त बायांनाहि कोपरखळ्या मारीत, त्या पुढच्या रांगेकडे सरत होत्या, " जरा सरकून घ्या कीं. दुसऱ्यांनाहि पहायचं आहे म्हटलं ! फत्कल मारून काय बसतां घरच्यासारखं, जरा आवरून तरी बसायचं ! " असे चौफेर हुकूम त्या सोडीत होत्या.

इतक्यांत मंडपाबाहेर गडबड सुरू झाली. पडघम आणि घुंगरुंच्या काठ्यांच्या तालांत केशरी पटके बांधलेल्या पोरांचा एक मेळा आंत आला. तिकडे साऱ्यांचे लक्ष आहे हें पाहून, चटकन पुढें घुसून माईसाहेब गर्दीच्या पहिल्या रांगेत स्थिर झाल्या. तितका बोलभांडपणा अंगीं नसल्यानें बिचारी विमल शेवटच्या रांगेत, सतरंजीच्या दशा उसकटीत बसली होती. समोरचा सारा देखावा तिला निर्जीव चित्राप्रमाणें वाटत होता.

तिच्या पदराला हळुंच एक हिसका बसून ती दचकली. तिनें रागानें बाजूला पाहिलें. बांबूच्या पलीकडे पुरुषप्रेक्षकांच्या शेवटच्या रांगेंत तिच्याजवळच माधव येऊन बसला होता. त्यानें तिला बाहेर येण्याची खूण केली. ती हळूंच म्हणाली, " माईसाहेब आहेत कीं आंत ! "

" ती बसलीय पांचरीसारखी रुतून पहिल्या रांगेंत. आतां उठूं म्हटलं तरी तिला या गर्दीतून बारा वाजेपर्यंत उठतां येणार नाहीं. तुम्हीं दोघं येतांना दिसलांत रस्त्यांतून म्हणून मी मागोमाग आलों. चल. "

मांडवांत टाळ्यावर टाळ्या पडत होत्या. हास्याच्या लहरी उसळत होत्या. त्या गर्दीत माधव आणि विमल उठून बाहेर केव्हां गेले इकडे कोणाचेंहि लक्ष नव्हतें. मोठमोठ्या वाड्यांच्या अंधाऱ्या सांवलींतून ते चालले होते. जरा वेळानें विमल म्हणाली, " कशाला मनाला उगीच आशा लावली असं झालंय. यापरीस पूर्वीचं निर्जीण जिणं बरं होतं असं वाटायला लागलं आहे मला. " माधवचा चेहराहि चिंताक्रांत होता. कांहीं निश्चय करून तो जरा

वेळानें म्हणाला, " हें बघ विमल, मी आहे आपला सरळ अन् फटकळ गडी. तूं वयानं लहान आहेस, नाहींतर तुझ्या वडिलांना न जुमानतां आपण रजिस्टर लग्न केलं असतं. आजहि बरोबरीचे दोन सोबती आणून तुला घरांतून ओढून नेऊन कुठेंतरी जाऊन लग्न करीन मी, पण तें तुला पटणार नाहीं. त्याला तूं मवालीपणा, निर्लज्जपणा म्हणशील. पण माझे उपाय असे रांगडे आणि भडक आहेत. त्यांत नाजुकपणा, रडुबाईपणा नाहीं. माईसाहेबासारख्या निर्लज्ज बाईशीं वागतांना आपणहि निर्लज्जच बनायला हवं. सरळपणें सांगून बोलून वळायची नाहीं. कानांत सांगतों बघ. "

विमलनें डोळे मिटून, माधवच्या खांद्यावर मान ठेवली. त्याचा उष्ण श्वास तिच्या गालावरून वहात होता. गाल अन् ओंठाचा कणन् कण त्या स्पर्शानें जिवंत होऊन सुखावत होता.

* * *

मेळा संपला तेव्हां विमल पूर्वीप्रमाणें मागल्या रांगेत बसून पेंगत होती. माईसाहेबांनीं दुरूनच पायाच्या अंगठ्यानें तिला डिवचून जागें केलें. आणि त्या दोघी घरीं परतल्या.

त्यानंतर महिनाभर विमल अगदीं मलूल आणि गप्प होती. माई-साहेबांचीं सारीं कुत्सितपणाची बोलणीं तिनें प्रत्युत्तर न देतां ऐकून घेतली. या तिच्या नरमाईमुळें माईसाहेबांनाहि मनांतून आनंदाच्या उकळ्या फुटल्या.

यानंतर कांहीं दिवसांनीं एकदां माईसाहेब सकाळचा चहा घेत असतां बाहेरच्या खोलींत कोणाला ओकारी होत असल्याचा आवाज आला. त्या बाहेर आल्या तों विमल गोरेंमोरें तोंड करून भिंतीला टेकून जमिनीवर कलंडली होती. दोन दिवस लागोपाठ सकाळीं आणि जेवल्यानंतर दुपारीं विमलला ओकाऱ्या झाल्या. तिसऱ्या दिवशीं शेजारच्या ' लक्ष्मुबाई ' दुपारीं मुद्दाम ' बसायला ' आल्या. आणि त्यांनीं माईसाहेबांना हंसत प्रश्न केला, " काय माईसाहेब, आम्हांला पेढे मिळणार ना लौकर ? " माईना याचा अर्थच कळला नाहीं. नाक मुरडून आणि कपाळाला सतरा आठ्या घालून

त्यांनीं विचारलें, " काय म्हणतां तुम्ही लक्ष्मुबाई ? " मान वेळावीत लक्ष्मी-बाईनें विचारलें, " अहो माईसाहेब, तुम्हांला ओकाऱ्या सुरू झाल्या. शेजारीं मला स्पष्ट ऐकूं आल्या म्हणून म्हटलं आतां लवकरच चांदीचा पाळणा हलूं लागणार आमच्या माईसाहेबांकडे ! बरं होईल बाई ! मुलांबाळांवांचून घर कसं ओकंओकं वाटत होतं नाहीं ? "

तेव्हांच माईसाहेबांना एकदम चरका बसला. पण तोंडावर त्या कांहीं दिसू न देतां म्हणाल्या, " इश्श ! एवढं सुतावरनं स्वर्गाला नको जायला. पित्तानं आल्या झालं दोन दिवस ओकाऱ्या ! " पदर झटकून जातां जातां लक्ष्मीबाई हंसत म्हणाल्या, " किती लपवाल माई ? शेवटीं दिसेलच हो ! पण सर्वांआधीं मीच ताडलंय. पाळणा हलवायचा पहिला मान माझा बरं का ? "

लक्ष्मीबाई जाण्याचीच माईसाहेब वाट पहात होत्या. दार लावून त्या आल्या अन् करकरां दांत खात आंत जाऊन कडाडल्या, " चांडाळणी, काय मांडलंस हें ! सात पिढ्या नरकांत घालायचा बेत केलास कीं काय ? शेजारीसुद्धां विचाराला लागले. बरं, त्यांना वाटलं कीं, मीच आहे म्हणून—नाहीं तर ? पण आतां काळं फांसणार का आमच्या तोंडाला ? बोल कीं ? नाहींतर चांगला डाग देते जिभेला—" विमलनें मुकाट्यानें 'हो' म्हणून मान हलविली.

सारा कजागपणा लोपून आतां माईसाहेबांचे पाय लटपटूं लागले. कपाळाला हात लावून त्या खालींच बसल्या. वेळींअवेळीं आपण आळींतल्या साऱ्या बायांची निंदा केली, असतील नसतील तितकीं गृहछिद्रें चव्हाट्यावर मांडलीं—आणि आतां ? आपल्या स्वतःच्याच पोरीचं पाऊल वांकडं पड-ल्याचा नुसता संशय कोणाला आला तर टीका, उपहासानें आळींतल्या साऱ्या बायका नुसतं टोंचून घेतील आपल्याला. या कल्पनेनेंच त्यांना ब्रह्मांड आठवलं. संध्याकाळीं दादासाहेब घरीं आल्यावर दार लावून त्यांचीं दोन तास खलबतं चाललीं होतीं. म्हणजे माईसाहेब मराठींतले बहुतेक शब्द खलास करीत होत्या आणि दादासाहेब खालीं मान घालून ऐकत होते.

या खलबताचा परिणाम म्हणजे दुसऱ्या दिवशीं सकाळींच दादा-साहेब माधवच्या बिऱ्हाडीं घाबऱ्या घाबऱ्या जाऊन पोहोंचले.

कोणी पगडीवाले दारांत आलेले पाहून माधवच्या आईनें पाट पुढें केला, "कोण आपण?"

"सदाशिव सबनीस माझं नांव. आपल्या माधवरावांच्या स्थळासाठीं आलोंय् मी."

"सबनीस कां? मागं भाऊजी अन् माधव गेले होते एका सबनीसा-कडे आपण होऊन मागणी घालायला, अन् त्यांची ती तिसऱ्या लग्नाची अहंभाव बायको आहे तिनं म्हणे माझ्या माधवला अगदीं तोडून तोडून बोलून घेतलं, तेच सबनीस का तुम्हीं? असलांत तर साफ सांगतें कीं, असल्या घरची मुलगी आम्हांला बिलकूल करायची नाहीं. त्यांतून दुसरीच एक मुलगी आली आहे माझ्या मनांत—मनकर्णिका नांवाची..."

खालीं मान घालून दादासाहेब म्हणाले, "तो दारांतला जोडा घेऊन हवा तर मारा माझ्या तोंडांत पण आतां 'नाहीं' म्हणूं नका. आमची 'ही' अजून पोर बुद्धीची आहे. जाऊं द्या. व्यवहाराचं बोलणं व्हायची वेळच आली नव्हती अजून, पण पोरीबरोबर हजार रुपये हुंडा म्हणून मी स्वखुषीनें देईन. तेव्हां आतां पोरीला पदरांत घेतली म्हणेपर्यंत मी उठणार नाहीं येथून–"

तेवढ्यांत माधव डेअरीचं काम आटपून वर आला. हात जोडून पत्र्यांत बसलेली दादासाहेबांची मूर्ति पाहून त्याला नवलच वाटलेलें दिसलें. आईनें सर्व प्रकार सांगितल्यावर तो म्हणाला, "माझ्याकडून मी 'नाहीं' नाहीं म्हणत. माईसाहेब बोलल्या तो माझा अपमान नव्हे, आमच्या घराण्याचा! तेव्हां पहिलं म्हणजे माईसाहेबांनीं स्वतः आमच्या घरीं येऊन आईची क्षमा मागायला हवी, अन् लग्नाचं बोलणं करायला हवं तरच माझी संमति आहे असं समजा—कां ग आई, असंच ना?"

" असंच बाबा. माझी मनकर्णिका नसली तर तुझी विमल असूं देत. कुठुन तरी हळद लागूं दे अंगाला म्हणजे झालं."

दादासाहेबांनीं सुटकेचा श्वास सोडला.

नाहीं होय म्हणतां म्हणतां शेवटीं नाक मुठींत धरून माईसाहेबांना माधवच्या घराची पायरी चढावी लागली. गुळमुळीत कां होईना पण माफीहि मागावी लागली. वरवर हंसून त्यांनीं आपला अपमान लपवण्याचा प्रयत्न केला. यावेळीं त्यांचा हात दगडाखालीं सांपडला होता, तो एकदां निघाला म्हणजे मग—!

मार्गशीर्षातला पहिलाच मुहूर्त धरला होता. टाळी वाजली. अक्षता पडल्या. सप्तपदीहि झाली. भटजी पांच मिनिटें विश्रांति घेत पलीकडे जाऊन चहाचा कप तोंडाला लावीत होते. पाय मोकळे करण्यासाठीं अष्टपुत्री नेसलेली, मुंडावळ्या बांधलेली विमल बायकांत येऊन बसली होती. माधवची आई कांहीं सुखाचे, दुःखाचे अश्रू गाळीत, नवी सून डोळे भरून पहात बसली होती. तेवढ्यांत कमरेला आडवा पदर खोंवून, पाय आपटीत माई-साहेब तेथें आल्या. हात ओंवाळून, लटकें हंसूं तोंडावर आणून साऱ्यांना ऐकूं जाईल एवढ्या आवाजांत त्या म्हणाल्या, " झालं बाई मनासारखं एकदां विमल ? आमच्या घरीं अगदीं वनवासांत होतीस ना ? आतां राम-राज्य करायला जा खुशाल सासरीं ! नाहीं तरी असली चवढाळ पोरगी घरांत ठेवाची म्हणजे पदरांत विस्तव बांधूनच फिराचं हो ! बरं झालं. आतां सासुबाई अन् सुनबाई हव्वा तो गोंधळ घाला नव्या घरांत. अक्षता पडल्या. सप्तपदी झाली. आतां ही आम्हाला मेली अन् आम्हीं हिला मेलों. आतां सासुबाई ! खुशाल घेऊन मिरवा तुमची दिवस गेलेली सून ! 'दीड जीव' येतो आहे तुमच्या घरीं !"

मंडपांतल्या साऱ्या बायका एकदम दचकल्या. माधवच्या आईचा चेहरा लाल झाला. " काय बोलताय् तुम्हीं ? कांहीं मेलं जिभेला हाड ? " कमरेवर हात ठेवून माईसाहेब किंचाळल्या, " नाहीं हो, माझ्या जिभेला

खरंच हाड नाहीं. तुमच्या तरी आहे ना ? नीट पाहून घ्या. मला कोणाची डर आहे बोलाला ? पोरीला चांगले ऽ ऽ तीन–चार महिने लोटलेत भाद्रपदा-पासून. सप्तपदी झाली. आमच्या कुळाचा संबंध सुटला. आतां काळोखी लागली तर तुमच्याच कुळाला लागायची. आतां ह्वीतर ठेवा, नाहींतर लाथ मारून हांकलून द्या घराबाहेर ! ”

बायकांच्या मंडपांतला हा कलकलाट, आई आणि माईसाहेबांचे चढ-लेले आवाज ऐकून बोहल्याजवळून माधवहि तेथें आला आणि माईसाहेबांपुढें हात जोडून म्हणाला, “ बस्स करा मातोश्री, फार झालं ! मला भलती शंका यावी अन् बेअब्रूच्या भीतीनें मी हिला टाकून द्यावं ही तुमची सारीं मनो-राज्यं फोल आहेत. प्राण गेला तरी एरवीं तुम्हीं तिचं माझं लग्न होऊं दिलं नसतं. कां ? तर आमचं एकमेकांवर प्रेम दिसलं ना ! आम्हीं सुखी होऊं ना तुमच्या नाकावर टिच्चून ! तुमच्या घरच्या दुर्लौकिकाच्या भीतीनें तरी चटकन् लग्न उरकून मोकळं व्हावं असं तुम्हांला वाटावं, म्हणून दिवस गेल्याची बतावणी करण्याचा, जगावेगळा उपाय मीच सुचविला होता विमलला, गेल्या गणपति उत्सवांत, मेळ्याच्या मंडपांत ती भेटली तेव्हां. हा प्रयत्न किती यशस्वी झाला हें आतां प्रत्यक्ष दिसलेंच ! आमचा हा यत्न भलत्या थराचा होता खरा, पण चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा लागते. तेथें गुलाब मोगऱ्याचें काम नाहीं. यावरूनच जें समजायचं तें समजून घ्या.”

स्वतःच्या लग्नानंतर अगदीं पहिल्यांदाच माईसाहेबांची मान खालीं वळली अन् डोळ्यांतून पराजयाचें पाणी वाहूं लागलें.

पलिकडे मंडपांत पोरांनीं लावलेला फोनो आनंदानें गात होता :

या हो घ्या हो राया–करपाशीं ही काया !

(१९४४)

## नर्मदेऽहर ! [प्रादेशिक भावकथा] (१०)

नर्मदातीरीं कुबेरेश्वराच्या देवालयांत संध्याकाळच्या आरतीच्या घंटा, शंख आणि झांजा वाजत होत्या. टेकड्यांवरून घरीं परतणाऱ्या गोखुरांच्या धुळींत देवळाबाहेर येणारा धूपाचा सुगंधी धूर मिसळून जात होता.

सर्वत्र "नर्मदेऽहर–जय नर्मदेऽहर" असा घोष चालला होता. अशा वेळीं देवळाशेजारच्या एका झोंपडींत चंद्रशेखरचा जन्म झाला.

नर्मदाकांठावरील सारें वातावरण शंकरमय आहे. नदीच्या वाळवंटांत लाल, गुळगुळीत, असे गोल गोटे सांपडतात; त्यांपैकीं अत्यंत दुर्मिळ अशा-वर एक अर्धचंद्राकृति एक पांढरा पट्टा असतो. त्याला शंकराचा 'चंद्रशेखर बाण' असें म्हणतात. चंद्राच्या कलांबरोबर हा पांढरा पट्टा कमीअधिक होत असतो. आपल्या पूजेंतील अशा बाणावरून महादेवरावांनीं या नव्या जीवाचें नांव चंद्रशेखर असें ठेविलें होतें. वीस वर्षें नोकरी करून, जगांतल्या मायिक व्यवहाराचा, आणि रागद्वेषाचा वीट येऊन ते नर्मदातीरीं वानप्रस्थ वृत्तीनें येऊन राहिले होते. तेथेंच त्यांच्या घरांतला हा पहिला पुत्रजन्म होता.

चंद्रशेखरच्या नांवाला साजेल असाच त्याच्या भोंवतालचा संसार होता. चंद्रमौळी घरावरील लालसर काळ्या, अर्धचंद्राकृति कौलांच्या फटींतून सूर्याचे किरण तिरकस समांतर ओळीनें त्याच्या पाळण्यावर पडत असत–धुळीचे तरंगते कण त्यांत हेलावत जाऊन क्षणभर चमकत, आणि अदृश्य होत. इतर खेळण्याऐवजीं पाळण्यांत पडून आपल्या लालसर चिमुकल्या मुठींत ते किरण धरण्यांची धडपड करणें, हाच बाळ शेखरचा खेळ असे.

चालूं लागल्यानंतर दररोज अधिक वाढणाऱ्या वर्तुळांतलें जग त्याच्या डोळ्यांना दिसूं लागलें. झोंपडी गांवाबाहेर असल्यानें त्याला फारसे खेळगडी

नव्हतेच. त्याचे वडील स्वतःसाठीं संस्कृत आणि इंग्रजी, आणि पत्नीसाठीं मराठी आध्यात्मिक पुस्तकें मोठ्यानें वाचीत. ते अगम्य आणि अज्ञेय असे शब्द ऐकतांना शेखरला कंटाळा येई, आणि तो त्यांचा डोळा चुकवून एकटाच नर्मदातीरानें भटकत जाई.

जीमध्यें डोकेंहि शिरणार नाहीं अशा छोट्या देवळीपासून, प्रचंड घुमटांच्या देवळांपर्यंत शंकराच्या देवाल्यांची नर्मदातीरावर गर्दी झालेली आहे. त्यांपैकीं बहुतेक देवळें ओसाड पडलेलीं असतात. देवळाभोंवतालीं वडाच्या सांवलींत, अथवा मंडपाच्या गार फरशीवर डोळे मिटून गाई रवंथ करीत बसत. पांढरे शुभ्र अंग आणि काळें कुळकुळीत तोंड असलेलीं माकडें अंधाऱ्या गाभाऱ्यांत खुशाल झोंपा घेत, अगर बाहेरच्या वडाच्या फांद्यांवरून जमिनीपर्यंत लोळणाऱ्या आपल्या जातभाईंच्या शेपट्यांना धरून खेळ खेळत. त्या खेड्यांत मध्यान्हकाळीं असलेली शांतता शहरांत मध्यरात्रींहि नसेल. उंच दरडीवर उभें राहिलें म्हणजे किंचित बांक आलेलें नर्मदेचें पात्र उन्हांत ठेवलेल्या एखाद्या लखलखीत तलवारीच्या पात्यासारखें चमकतांना दिसे.

सकाळीं सारे घाट लोकांनीं फुलून जात. 'नर्मदेऽहर' असा घोष करून सारे लोक पात्रांत डुंबून स्नान करीत. पुरुष मंडळी परतली, व सूर्य जरा आणखी वर आला म्हणजे सर्व स्त्रियांची घाटाकडे रांग लागे. लालभडक रंगाचे जाडेभरडे परकर, त्यांवर गोल नेसलेले आंखुडसे लुगडे; पाठीकडे बंदांनीं बांधलेली कांचोळी, असा त्यांचा वेष असे. कसल्याशा पाल्यानें त्यांपैकीं बहुतेक स्त्रिया आपले दांत रंगवून लाल करीत. जरा सधन असलेल्या स्त्रियांनीं दांतांत सोन्याच्या बारीक चुका मारून घेतलेल्या असत.

नर्मदातीरचे सारे कांठ शाडूसारख्या पांढऱ्या शुभ्र मातीचे आहेत. ताटांतून चाकूनें बर्फीची चौकोनी वडी कापावी तशी या मऊ सुगंधी मातीची पातळशी वडीहि कापून घेतां येईल. घाटावर भिजवून ठेवलेली ही मऊ मलईसारखी माती लावून त्या स्त्रिया तांब्याचा हंडा लखलखीत लाल, आणि पितळेची कळशी सोन्यासारखी पिवळी उजळून काढीत. खांद्यावर धुण्याचे

पिळे आणि डोक्यावर हंडा–कळशी ठेवून, दोन्ही हात मोकळे सोडून त्या सराईत बेफिकिरीनें चालत. आपल्याकडील शिंदेशाही साखळ्यांपेक्षांहि कितीतरी मोठ्या चांदीच्या बेड्यांसारखे भलेमोठे तोडे [ कड्डे ] त्यांच्या पायांत खुळखुळ वाजत. खेड्यांतल्या लोकांच्या त्यांच्या चौकशा आणि उठाठेवी त्याच तालावर चालत. ही गम्मत पहात शेखर दुपारपर्यंत उभा असे.

चंद्रशेखरचें बोट धरून त्याचे आईबाप संध्याकाळीं टेकड्यांवरून सहलत जात. नर्मदातीरावरील टेकड्यांत सह्याद्रीचा खडकाळ, काळाभिन्न कठोरपणा नाहीं. नर्मदेच्या सुंदर पात्राकडे जणुं सृष्टिदेवीनेंच उंचावून कौतुकानें पहावें, अशा त्या टेकड्या नदीतीराशीं वांकून पसरल्या आहेत. समुद्राच्या पृष्ठावरच्या जशा लाटा, तशा त्या जमिनीवरच्या टेकड्या. छोटे ससे पटापट उड्या मारीत जातात, त्याप्रमाणें नदीतीरानें आनंदानेंच अंतराळीं लहान लहान उड्या घेतल्या असाव्यात, आणि त्यांचेंच अचल मूर्तरूप या टेकड्यांत झालें असावें असेंहि कधीं कधीं वाटतें. संथपणें रवंथ करीत असलेल्या गाईच्या अंगावरून तिच्या मालकानें मायेचा हात फिरवावा, आणि तिच्या पाठीवरून आनंदाच्या लहरी थरारून जातांना स्पष्टपणें दिसाव्यात, तशा त्या छोट्या टेकड्या दिसतात, अशी कल्पनाहि शेखरचे वडील बोलून दाखवीत. छोटीं छोटीं लालभडक फळें लागलेलीं बोरींचीं बेटें; पिसासारखीं मऊ पिवळीं मखमली फुलें, आणि लांकडासारख्या कडक शेंगा लोंबकळत असणारी बाभळीचीं झाडें हीच त्या टेकड्यावरील बागशाही.

वाढत्या संध्येबरोबर अधिक उंच असलेल्या टेकड्यांच्या लांबलचक छाया खालच्या सपाट टेकड्यांवर पसरत. दूरवरचे सोमेश्वराच्या देवळांतले चौघडे वाजूं लागत. चंद्रशेखर संध्याकाळच्या खेळांतली शिंपा–खड्यांची बाळदौलत गोळा करी, त्याची आई आपलें विणकाम, आणि वडील आपलें पुस्तक किंवा मनन-वही आवरीत, आणि शांति–समाधानाचा सांठा मनांत शीगभर भरून घेऊन ते घराकडे परत जात.

चंद्रशेखरला पद्धतशीर असें शिक्षण प्रथम मिळालेंच नाहीं. एकदां त्याच्या वडिलांनीं त्याला गांवठीं शाळेंत नेऊन बसविलें होतें खरें. लंगोटी लाविलेली, मळकट घाणेरीं कुडती घातलेलीं; कानापर्यंत लांब शेपटे काढलेलें काजळ डोळ्यांत भरलेली कुणबाऊ गुजराथी पोरें, एकावर एक अशा तीन लांकडी ओट्यांवर गोंगाट आणि धिंगामस्ती करीत बसलीं होतीं. दोन मास्तर मेणचटलेलीं लालसर काळी नागरी पागोटीं घालून, टेबलावर पाय पसरून, तपकिरीचे बार भरून गप्पा मारीत होते. वर्गाचा वरिष्ठ मुलगा त्या गोंगाटांत मोठ्यानें हेल काढून परवचा सांगत होता. त्या घोळक्यांत चंद्रशेखरला बावरल्यासारखें झालें, आणि तो एका कोपऱ्यांत आंग चोरून बसला. शाळा सुटल्याबरोबर या नवख्या ‘ दखणी ’ पोरांवर साऱ्यांचा हल्ला झाला, त्याची पाटी फुटली, पुस्तकांचे तुकडे झाले, आणि स्वच्छ कपड्यांच्या चिंध्या झाल्या. त्यानंतर तो पुन्हां शाळेत गेला नाहीं. घरीं आई-जवळ बसून तो मुळाक्षरें शिकला, आणि लौकरच त्याला वाचनाची इतकी गोडी लागली कीं तो त्यांत तासन्तास रमून जाऊं लागला.

आठ महिने प्रशांत आणि गंभीरपणें वाहणारी नर्मदा नदी पावसाळ्यांत मात्र चंडीचें उग्ररूप धारण करते. सोसाट्यानें वाहणाऱ्या तडाख्यांनीं वेडावून, व भयंकर भोवऱ्यांत गिरगिरत तिच्या लाटा फेसाळत धांवत जातात. उन्हाळ्यांत अर्धें पात्रहि कोरडें टाकून नववधूप्रमाणें अंग चोरून मंदगतीनें वाहणारी नर्मदा पावसाळ्यांत मात्र अंगांत भूतसंचार झालेल्या स्त्रीप्रमाणें लाटांच्या झिंज्या पिंजारून, जलघोषांच्या किंकाळ्या फोडीत, घाटांशीं धडका देत बेफामपणें उसळत जाते. त्यावेळीं अर्धें गांव जलमय होतें. घरांच्या अंगणांत पांढरे काळे गुळगुळीत बारीक बोरू उगवतात, आणि कौलारू छपरांवरून वीतवीत उंच हिरवें गार गवत उगवतें.

अशा वेळीं जमीन वीतभर खोल चिंब भिजलेल्या झोंपडींत एका जीर्ण खाटेवर आईला घट्ट बिलगून चंद्रशेखर निजत असे.

तीन दिवस झाले, त्याची आई त्याच्या जवळून उठली नव्हती. पांघरुणाबाहेरूनाहि तिच्या अंगाची धग लागून शेखरचें अंग भाजे. खाटेवर ओणवलेल्या वडिलांच्या डोळ्यांतले ऊष्ण अश्रू टपटप शेखरच्या तोंडावर पडत. त्याचें बालहृदय कंपित होई. पूर्वी कधी न दिसलेली भीतीची काळी छाया त्याच्या डोळ्यांपुढून येऊन जाई. उघाडी पडली म्हणजे त्याला बाहेर पाठविण्याचा त्याच्या वडिलांनी फार प्रयत्न केला; पण त्यानें आईची बाजू सोडली नाहीं. धगधगीत, वाफारलेल्या डोळ्यांनीं सुन्न होऊन पडलेल्या आईला तो रडव्या हांका मारून गदगद हालवी. अगदीं क्षीण पांढरा-फिकट हात ती पांघरुणाबाहेर काढी, आणि मोठ्या कष्टानें शेखरला आपल्या हृदयाशीं घेई.

त्याच्या कानाला तिच्या छातींतील घरघर आणि मंद स्पंदन ऐकूं येई. शेखरकडे पाहून नर्मदातीरावरील वाळूंतील उकरलेल्या झऱ्याप्रमाणें तिचे डोळेहि एकाएकीं भरून ओसंडू लागत.

एके रात्रीं शेखर एकाएकीं किंचाळून जागा झाला.
त्याचें डोकें छातीशीं घट्ट बिलगून धरणारे आईचे मऊ हात त्याला एकाएकीं लांकडाच्या चिपांसारखे टोंचूं लागले होते.

तो पुन्हां ओरडला.

चार दिवस अनिश्चित जाग्रणें केल्यानें अर्ध्या तासापूर्वीच त्याच्या वडिलांचा जरासा डोळा लागला होता. ते दचकून जागे झाले आणि दिवा मोठा करून बिछान्याजवळ आले.

त्या उजेडांत शेखरच्या आईचें तोंड पिठासारखें पांढरें फटक, आणि कृत्रिम मुखवट्यासारखें जड आणि निर्जीव दिसत होतें. त्याच्या वडिलांनीं तिचे डोळे झांकले आणि शेखरभोंवतालचे हात काढून त्याला बाजूला केलें.

सुखांत किंवा दुःखांतहि नेहमीं समचित्त, शांत, आणि गंभीर दिसणारे त्याचे वडील जोरानें हुंदके देऊन रडत होते.

शेखर गोंधळला. डोळ्यांसमोर असूनही आपली आई हालचाल करीत नाहीं, बाबाशीं बोलत नाहीं, समोर दिसत असूनहि देवाच्या घरीं गेली असें बाबा म्हणतात, हें सारेंच शेखरला गूढ वाटे.

हंसण्याप्रमाणें रडणेंहि सहवेदनात्मक असतें. त्यामुळें कळत नसतांहि वडिलांच्या रडण्याला शेखरनें सांथ दिली.

' नर्मदेऽहर, नर्मदेऽहर ' या घोषांत त्याच्या वडिलाबरोबरच्या चार गुजराथी ब्राह्मणांनीं आपल्या आईला बांधून कोठेंसें नेलेलें त्यानें पाहिलें. कुबेरेश्वराच्या पुजाऱ्याच्या बायकोनें शेखरला उचलून त्याच्या हातांत खाऊ देऊन आपल्या मुलांमध्यें नेऊन बसविलें.

त्यानंतर किती तरी रात्रीं, नेमक्या त्याच वेळेला शेखर दचकून उठे. झोंपडीच्या कोपऱ्यांत, घोंगडीच्या चौघडीवर मांडी घालून, पुतळ्याप्रमाणें ध्यानस्थ बसलेली त्याच्या वडिलांची अचल मूर्ति पाहून शेखरला पुन्हां भीति वाटे व तो रडूं लागे. आपले लालसर झालेले डोळे उघडून त्याचे वडील त्याला थोपटून निजवीत.

......त्या खेड्याच्या वस्तीपासून दूर ' मुरलीसंगम ' नांवाचें एक एक अत्यंत रम्य स्थान नर्मदातीरावर आहे. संगम असें नांव असलें तरी तेथें कोणत्याहि दृश्य नदीचा नर्मदेशीं संगम दिसून येत नाहीं. ' मुरली ' नांवाची एक अगदीं लहानशी नदी तेथें वाळवंटाच्या खालून वहात येऊन, अदृश्य रीतीनें नर्मदेला मिळते. दोन वैरी घराण्यांत दैवगतीनें पडलेल्या बहिणी, सासरच्या मंडळींना चोरून, एकादे दिवशीं गुप्त रीतीनें भेटाव्यात, तशा रीतीनें जगाच्या नजरेआड, पाण्याच्या पडद्यामागें, या दोन जलदेवतांची प्रीतिभेट होत असते !

शेखरबरोबर एका पन्हईत [ होडींत ] बसून त्याचे वडील तेथें गेले. नर्मदेच्या डाव्या तीरावर हिरव्यागार टेकड्या आणि घाट, तर उजवीकडे मैल मैल लांब पसरलेलें राजपिपळा संस्थानचें उजाड व पांढरें शुभ्र वाळवंट; यांच्यामधील प्रवाहांतून त्याची नांव चालली होती. होडीच्या अरुंद कांठा-

वरून तोल सावरून झपझप् चालत, लांब वेळूची काठी पाण्यांत रोंवून कोळी ती नाव सरसर पुढें ढकलीत आणि बेफिकीरपणें हेंगाडी गुजराती गाणीं ललकारीत. विस्फारीत नेत्रांनीं ती सारी शोभा पहात शेखर वडिलांवर प्रश्नांचा भडिमार करीत होता; पण ते मान खाली घालून उदासपणें मूक-वृत्तीनें बसले होते. त्यांच्या हातांत एक लहानसें पांढरें गांठोडें दिसत होतें. मुरली संगमावर पोहोचल्यावर तीरावर उतरून त्याच्या वडिलांनीं तें गांठोडें सोडून पाण्यांत ओतलें. काळसर गोल लांकडी तुकड्यासारख्या वस्तूंचा ढीग हळूंहळूं पाण्याखालीं नाहींसा झाला. स्नानविधि उरकून उदास चित्तानें तें परतले.

त्यानंतर एके दिवशीं भल्या पहाटेसच वडिलांनीं शेखरला उठविलें. बाहेर अर्धवट अंधार होता. बहुतेक तारे मावळले होते; परंतु शुक्राचा तारा मात्र क्षितिजाजवळ चमचम करीत होता. थंडगार वारा अंगाला झोंबत होता. अशा वेळीं खांद्यावर कपडे टाकून, व शेखरचें बोट धरून त्याचे वडील घांटावर स्नानाला निघाले.

कापसाच्या पिंजलेल्या राशीप्रमाणें, किंवा आकाशांत उडणाऱ्या ' म्हाताऱ्यांच्या ' समुदायाप्रमाणें दाट धुकें त्यांच्या अंगाला बिलगत होतें; जणूं काय थंडीमुळें नर्मदेनें एकादी पांढरी शालच पांघरलेली असावी ! शिवमहिम्नाचा पाठ करीत त्याच्या वडिलांनीं स्नान केलें, पंचा धुवून काढला आणि शेखरच्या अंगावरहि चार तांबे ओतले.

घाटावरील कोनाड्यांतलें भस्म घेऊन, पूर्वाभिमुख होऊन महादेव-रावांनीं तें दंडाला, कपाळाला आणि छातीला लावलें आणि संध्या आटोपली. हळुहळु त्यांचे डोळे मिटूं लागले.—

नर्मदेचा संथ प्रवाह बुडबुडत वहात होता. घाटाच्या भिंतीशीं चिकटून पाणी जरा वर चढे आणि खालीं पडतांना त्याचा अस्फुट आवाज होई. त्या शांत स्वरांतच मिसळून त्याच्या वडिलांचा खोल तुटक आवाज येऊं लागला—

—‘ आई ! नर्मदामाई !! चित्तशांतीसाठीं, श्रेयसाधनासाठीं तुझ्या पायाशीं येऊन राहिलों, आणि इथेंच शेवटीं तुझ्या मांडींवर डोकें ठेवून देह ठेवावा, हीच माझी इच्छा होती. पण माझ्या आधीं तुझ्या मुलीवरच तुझी कृपा झाली, आणि तिला तूं उचलून आपल्याकडे नेलेस.

क्षमा कर......किती यत्न केले तरी आतां येथें पूर्वीची शांति लाभत नाहीं.

—नाहीं बरं आई ! तूं म्हणतेस तसं नाहीं. ऐहिक प्रेमाचे बंध, जीविताचा मोह, यांच्या योगानें माझ्या मनाला ताप होत नाहीं.

दूर अंतरावर, कांचेच्या खिडकीमागें उभें राहून कुणी आपल्याला जवळ बोलवीत असावें, त्याचे शब्द ऐकूं येऊं नयेत. पण मूर्ति मात्र दिसावी; त्याप्रमाणें तुझ्या प्रवाहांत, खोल अंतराळी उभी राहून तुझी कन्या मला बोलावते आहे. असें सारखें मला वाटतें—आणि मला वेड्यासारखें होतें.

तुझ्या प्रवाहांत माझ्या जीवाचा प्रवाह मिळवून, तुझ्याजवळ राहून माझ्या वाट पहाणाऱ्या सहचारिणीबरोबर आनंदानें अनंताकडे वहात जावें असा मोह मला सारखा होतो; पण तूं पाठविलेल्या या लहान जीवाची बेडी मला मागें ओढते.

न जाणों......एकादे दिवशीं तो मोह अनिवार होईल, आणि कदाचित् या चिमण्या जीवाला जगांत अनाथपणें रडत टाकून, अधीर होऊन, उडी टाकून मी तुझ्याकडे येईन. पण तेथेंही या जीवाचा कर्तव्यघात मला जाळीत राहील.

आणि म्हणूनच आतां तुझा निरोप घेतों आई !

—विसरणार नाहींस ना मला ?

कार्तिकी पौर्णिमेला सुवासिनी तुझ्या पाण्यावर दीपज्योती सोडून देतात; त्याप्रमाणें बाहेरचा जीवनाच्या प्रवाहावर शेखरची जीवज्योति मला मार्गाला लावूं दे. कर्तव्य पार पाडून आल्यावर जवळ आलेल्या मुलाप्रमाणें मला प्रेमानें जवळ घेऊन निर्वाण शांति देशील ना ?

त्यांनीं डोळे पुसले.

शेखरचा हात धरून, घाटाच्या पायऱ्या चढून ते वर गेले.

ते दररोज पूजा करीत असलेल्या देवालयांत त्यांनीं शोडषोपचारानें शंकराची पूजा केली. सोमेश्वर–कुबेरेश्वराचें शेवटलें दर्शन घेतलें.

कितीएक वर्षांपासून पेटीच्या तळाशीं पडलेला आबाशाही जुना लांब लोकरी कोट, आणि जुनी विटकी जांभळी पगडी या शहरच्या जीवनाच्या जीर्ण खुणा अनेक वर्षांनीं त्यांनीं पुन्हां अंगावर घातल्या आणि ते झोपडी- बाहेर पडले.

इतकीं वर्षें झोपडींत रहाणारे दक्षिणी ' महाराज ' आज जाणार ही बातमी खेड्यांत पसरली. कितीतरी गुजराथी ब्राह्मण आणि तीरावरच्या साध्याभोळ्या, कोळीकोळिणी दारासमोर जमल्या.

' पगे लागूं, महाराज–पगे लागूं ' ( नमस्कार करतों महाराज ) म्हणून साऱ्यांनीं प्रणाम केला. देवळाच्या पुजाऱ्यानें नर्मदेचा प्रसाद म्हणून नारळ, भस्म, आणि एक तांबडा बाण त्यांना दिला.

—' नर्मदा माताने भूलशो मा ' ( नर्मदा माईला विसरूं नका ) म्हणून त्यांनीं आठवण दिली. दोघांनीं त्यांचें सामान उँचललें व एका कोळिणीनें शेखरला उचलून घेतलें. भोळ्या पण भल्या खेडवळांचा तो जमाव गांव शीवेपर्यंत त्यांच्या मार्गे आला. कितीएक जणांच्या डोळ्यांत आंसवें तरारलीं होतीं.

**नर्मदे ऽ हर—नर्मदे ऽ हर !**

असा घोष करून ते गांवाकडे परतले. शेखर आणि महादेवराव गांवाबाहेरील उंच दरडी तुडवीत कितीतरी मैल दूरच्या लहान स्टेशनाकडे चालले होते. त्या पांढऱ्या शुभ्र मातीच्या दरडींना तिकडील लोक '**भेखड,**' असें म्हणतात. सोंगट्यांच्या पटावरील चौकटीसारख्या उभ्या आडव्या सरळ भेगा त्यांवर गेलेल्या होत्या. मागून दूर अंतरावरून सकाळच्या आरतीचे घंटाध्वनि ऐकूं येत होते, आणि पुढें दूरवर सूर्यप्रकाशांत रेल्वेचे रूळ चमकत होते.

इतक्या वर्षांचें सुखशांतीचें जीवन महादेवरावांना आठवत होतें. स्वतः होऊन मागें टाकून आलेल्या व्यावहारिक जीवनांत; निंदा, राग, द्वेष, शत्रुत्व, स्वार्थ, आणि अभिमान यांनीं बुजबुजलेल्या त्या जगांत अगतिक होऊन इतक्या वर्षांनीं ते पुन्हां पाऊल टाकीत होते. गायकवाडी रेल्वेची खेळांतल्या गाडीसारखी छोटीशी आगगाडी डुलत डुलत स्टेशनाशीं आली शेखर आणि महादेवरावांनीं नर्मदा तीरावरून आपले पाय उचलले.

—' नर्मदेऽ—नर्मदेऽहर '

या सर्व उतारूंच्या घोषांत शिटी फुंकून, दमेकऱ्याप्रमाणें धांपा टाकीत, गाडी निघाली. शेखर आणि महादेवराव यांच्या डोळ्यांना नर्मदातीर दिसेनासें झालें.

+ + +

' अस्सं! म्हणजे शेखरच्या शिक्षणासाठीं पुण्यांत राहण्याचा बेत आहे तुमचा ' ?

जेवण झाल्यावर सुपारी तोंडांत टाकीत वामनरावांनीं महादेवरावांना प्रश्न केला. महादेवरावांचे ते चुलतभाऊ, परंतु बारा वर्षांतली ही त्यांची पहिलीच भेट होती.

—' हो! त्यासाठीं तर नर्मदातीर सोडून व्यवहारांत यावं लागलं मला. फार वर्षे झाली—मनांत इच्छा झाली कीं, एकदां तुला भेटावं. आपल्या घराण्याचीं फारशी माणसं उरलीं आहेत तरी कुठें ? हल्लीं गरीब मुलांना थोडक्यांत शिक्षण देणाऱ्या कांहीं संस्था पुण्याला निघाल्या आहेत म्हणून मी वाचलं आणि निघून आलों इकडे.

—पूर्वीपासूनचा माझा निवृत्ति-मार्गाकडचा ओढा तुला ठाऊक आहेच. त्यामुळेंच इतकीं वर्षे एकीकडे आनंदांत काढलीं. पण ही गेल्या-पासून नर्मदातीरावरचीं सारीं जुनीं स्थानेंहि तिच्या आठवणीनें तापदायक वाटूं लागलीं. कांहीं काळ चालायचंच हें. बुद्धीची समजूत पटली तरी हृदयाची पटत नाहीं!

मी म्हटलं तुझीं चार मुलं शाळेंत जातात इथेंच; शेखरहि जाईल त्यांच्याबरोबर. मी गरीब असलों तरी त्याचा भार मी तुझ्यावर पडूं देणार नाहीं. त्याचा खर्च मी तुला नियमित पाठवीत जाईन. तो कधीं घर सोडून बाहेर राहिला नाहीं, म्हणून आपल्यांपैकीं कोणीतरी त्याच्याबरोबर असावं एवढंच. नाहींतर नुसता विद्याभ्यासच असता तर बडोदं नव्हतं कां मला जवळ ? पण तुझ्यावर जीव ठेवून मी इतका लांब आलों. त्याला तुझ्या इथं ठेऊन चित्तशांतीसाठीं कुठें तरी तीर्थयात्रा करून येईन म्हणतों.'

—"ठीक–ठीक–! पण दादा ! शिक्षणाबद्दलची दूर राहून तुला मिळालेली माहिती अगदीं चुकीची आहे. अरे—हल्लीं शिक्षण म्हणजे इतकं डोईजड झालंय् म्हणतोस ! पण काय करतां ?

या माझ्या घरच्या चार कारट्यांच्या धांगडधिंग्यामुळेंच मला तर जीव नकोसा झालाय, अन् त्यांत या आईवेगळ्या मुलाची नाजूक जबाबदारी मी कशी घेऊं ? हो, आपलं स्पष्ट सांगावं हें बरं, नाहींतर तूं भलत्या कल्पना करून बसायचास तिकडे, आणि इथें याला करमलं नाहीं म्हणजे तो कांहीं तरी चहाड्या सांगायचा तुला, आणि तूं मनांत शिव्या मोजायचास मला. अन् हें पहा तुला पेन्शन मिळणार पंचवीस रुपये, त्यांतलं तूं ठेवणार किती, अन् देणार किती ?"

व्यावहारिक जगांतल्या या पहिल्या फटक्यानेंच महादेवरावांच्या डोळ्यांना टच्कन् पाणी आलें. ते म्हणाले—

—"असं कां म्हणतोस भाऊ ! माझं काय उरलंय् ? कुठेंहि पायीं भटकत जाऊन, दिसतील तीं स्थानं पाहून मनाला विरंगुळा वाटून घेईन मी. तुला शेखरसाठीं किती रक्कम पाहिजे तेवढी सांग म्हणजे झालं." वामनरावांच्या कपाळावर आठ्या चढल्या.

"अरे बाबा ! माझ्या पोरवड्यालाच मी त्रासलों आहे अगदीं. आणि ही नौकरीचीं शेवटचीं वर्षं एकदां आटोपलीं म्हणजे तुझ्यासारखाच

कुठंतरी दूर राहीन म्हणतों. तेव्हां बाबा, या गोंधळांत तुझ्या मुलाची भर नको आणखी—मग बरं म्हण, वाईट म्हण.

—अरे हो ! पण असंच कां करीनास ? पुण्याच्या या गर्दींत तुला बरं वाटायचं नाहीं हें ठरलंच. पण इथें रहाणंहि नको आणि शेखरला कुठें ठेवणंहि नको, अशी तोडच तुला सुचवली तर ? मी म्हणतों आपला सांगलीलाच जाईनास ? चांगलं गणपतीचें स्थान आहे, दत्त–महादेवाचीं स्थानंहि जवळ आहेत. कृष्णाबाईचं स्नानहि घडेल रोजचं.

तुझं अन् शेखरचं नर्मदामाईचं वेड माहीत आहे मला–अरे नर्मदा –काय, कृष्णा काय ? दोन्ही नद्याच ना ? मग काय ? हा ! हा !! हा !!!...”

त्यांनीं तंबाखूची चिमूट उंच धरून तोंडांत टाकली.

—आणि रात्रीच्याच गाडीनें शेखर आणि महादेवरावांची कृष्णातीराकडे रवानगी झाली.

* * *

असेच दिवस चालले होते....

संध्याकाळीं कृष्णाबाईच्या घाटावर महादेवराव आणि शेखर बसले होते.

दूरवर पसरत गेलेल्या काळ्या मातीच्या सपाट माळावर, क्षितिजाच्या कडेला, मावळत्या सूर्याचा लालभडक अर्धा गोल टेकला होता. त्या बिंबासमोर आलेलीं बाभळीचीं झाडें काळीं कभिन्न दिसत होतीं. तिकडे शून्य नजर लावून ते बसले होते.

महादेवरावांची अंगयष्टि आतां अगदीं वांकली होती.

शेखर मात्र बराच उंच झाला होता.

दररोज वडिलांच्या हाताला धरून तो त्यांना घाटावर आणून बसवी.

काळ्याकभिन्न चिकणमातीच्या उंच दरडींतून मार्ग काढून कृष्णानदी त्यांच्या समोरच चंद्रकोरीसारखी वांकडी वहात गेली होती. पुढें दूरवरचा

नदीवरील पूल एकाद्या अजस्र अजगरासारखा दोन्ही दरडींवरून पसरला होता. पण कांहीं केल्या कृष्णेच्या दर्शनानें, नर्मदातीरची त्यांची ओढ नाहींशी होईना. स्नानासाठीं घाटावरून पाण्यांत पाय ठेवला कीं, तो गुडघ्याइतक्या खोल चिखलांत रुतून बसे.

त्यांतच बाभळीचे कांटे व पाण्यांत फत्कल मारून बसलेले म्हशींचे तांडे, यांतून मार्ग काढून त्यांना स्नान करावें लागे. त्यांच्या डोळ्यांसमोर कृष्णा नदी दिसत असली तरी मनश्चक्षूसमोर नर्मदा नदी, आणि तिचें पांढऱ्याशुभ्र, स्वच्छ वाळूचें तीर हाच देखावा दिसत असे.

कृष्णातीरावरील गणपतीच्या, विष्णूच्या देवळांत वृद्ध भिक्षुकांचा तांडा जमे, आणि भांग घोटली जाई.

जवळच्या आंबराईत दरबारी थाटाचे अधिकारी आणि प्रतिष्ठित गृहस्थ जाळ्याच्या पलीकडे पांढरे चेंडू टोलवीत तासन् तास पळत, खिदळत आणि आनंद मानीत.

शेखरच्या शाळेंत देशीविदेशी खेळ चालत. अभ्यास, आणि खेळ यांत योग्य तो भाग शेखर घेई, परंतु त्यांत त्याचें मन रमत नसे. एकाद्या चित्राकडे त्रयस्थ दृष्टीनें पहावें, अशा रीतीनें भोंवतालच्या जीवनाकडे पहात ते पितापुत्र दिवस काढीत होते. असाच एक प्रसंग होता.

शेखरच्या वर्गांत, तांबड्या, हिरव्या, पिवळ्या रंगांनीं भरलेल्या नकाशाकडे रूळ रोखून, मास्तर भूगोल शिकवीत होते.

" नर्मदा नदी अमरकंटकाच्या डोंगरांत अशी उगम पावून, अशी अशी वहात, खंबायतच्या आखातांत समुद्राला मिळते. "

साऱ्या नर्मदा नदीचा प्रवाह त्यांनीं रुळाच्या अभिनयानें दाखविला.

" ए नर्मद्या ! अरे तूं नर्मदाकांठचा गोटा ना ? तूं नेहमीं जिच्या-बद्दल बडबडत असतोस, तीच ही तुझी आवडती नदी बरं कां लक्ष आहे इकडे, कां झोंपा काढतोस मागें बसून ? "

शेखर नकाशाकडे शून्यदृष्टीनें टक लावून पहात होता.

—तो नकाशा—त्याच्या पाठीमागील फळा त्याच्या मागील पांढरी भिंत, हीं सारीं त्याला अंधुक अंधुक झालेली दिसूं लागलीं. साऱ्या खोलीभर गंभीर आवाज करीत, किंचित् हिरवट झांक मारीत असलेलें नर्मदेचें कांचरंगी पाणी, समोरून दुथडीनें हेलावत जात आहे असें त्याला हुबेहूब दृश्य दिसूं लागलें. तीराजवळचें पाणी अगदीं शांत, दिसेल न दिसेल इतक्या संथपणें वहात असे. त्या दोन बाजूंच्या संथ प्रवाहांतून पात्राच्या बरोबर मध्यभागीं एक पांढराशुभ्र जोरदार पाण्याचा पट्टा खळाळत, उसळत, जाई. त्या ' धारे ' च्याच लाटा हळुहळू आडव्या पसरत तीरावरील घाटांशीं येऊन पोहोंचत— —तीरावरील देवळांत आरतीच्या घंटा वाजत होत्या. ' नर्मदेऽहर, नर्मदेऽहर ' — — असा घोष होत होता...

—' ए नर्मद्या ' !

' अरे, याला भोंवळ आलीं कीं काय ! ए सेक्रेटरी ! पळ, पाणी आण तांब्यांत लौकर, हीं रोगट, खुजट पोरं येतात कशाला मरायला इथं कुणाला ठाऊक, उगीच त्रास आम्हाला. '

मास्तर त्रासिक चेहरा करून पुटपुटत होते—बाहेर तासाची घंटा मोठमोठ्यानें वाजत होती.

शेखरनें डोळे उघडले.

' नर्मदामाई ' ! असा क्षीण उद्गार त्याच्या तोंडून निघाला.

' हो ! हो ! तुझी नर्मदामाई आहे नकाशावर. तीच दाखवीत होतों आतां. काय भांगबिंग झोंकलीस कीं काय असा उताणा पडायला ? जा घरीं बरं वाटत नसेल तर—ऊठ, हो चालता ' म्हणून मास्तर त्याच्या अंगावर खेकसले.

महादेवरावांना आतां घाटावरही जाववत नसे. जुन्या सांगलींतील एका पडक्या जुनाट वाड्यांतील खिडकीशीं, पोत्यानें शिवलेल्या आराम-खुर्चीवर पडून ते दूरवर उन्हांत लकाकणाऱ्या कृष्णाबाईच्या पात्राकडे पहात तासन् तास पडत. शेखरच्या शिक्षणाच्या वाढत्या खर्चामुळें होणारी ओढा

ताणं, आणि त्याची जवळ आलेली मॅट्रिकची परीक्षा यांनींच त्यांना तेथे बांधून ठेवल्यासारखें केलें होतें. नर्मदातीरावर जाऊन देह ठेवण्याचा आपला विचार ते दररोज बोलून दाखवीत. परीक्षा आटोपली कीं, दुसऱ्याच दिवशीं निघावयाचें असा त्यांनीं निश्चय करून ठेवला होता. शेखरनेंहि दोन चार मराठी शाळेंतल्या शिकवण्या करून, कांहीं वस्तूंची फिरती विक्री करून, भाड्यापुरते पैसे गोळा केले.

जाण्याचा दिवस जसजसा जवळ येऊं लागला तसतशी उत्सुकतेमुळें महादेवरावांची अस्वस्थता वाढूं लागली, आणि त्यांची जीर्ण देहयष्टि त्या तळमळीमुळें कापूं लागली. भोंवतालची बकाल वस्ती, दूरच्या काळ्याकभिन्न दरडीं, आणि कृष्णातीरची बाभळींचीं रानें यांचा देखावा असह्य होऊन ते डोळे मिटून तळमळत पडत. ही तळमळ दूर करण्याचा एकच मार्ग शेखरला ठाऊक होता.

खुर्चीजवळ त्यांच्या पायांशीं बसून शेखर त्याना सांगे—

“ बाबा ! विसरून जा आपल्या भोंवतालचा देखावा. आतां नर्मदा-तीरावर काय काय चाललें असेल तें आठवून सांगा बरं मला. ”

महादेवराव आपल्या सुरकुतलेल्या कपाळावरून, आणि मिटलेल्या डोळ्यांवरून हळुंहळूं हात फिरवीत. त्यांच्या कपाळावरच्या दोन तळमळीच्या आणि दुःखाच्या रेषा पुसटून जात, आणि चेहऱ्यावर हुरुपाचा तजेला येई. मिटल्या डोळ्यांपुढें तरंगणारीं, कालमानाप्रमाणें बदलणारीं, नर्मदातीरचीं चित्रें ते स्मृतीच्या रंगानें रंगवीत आणि आपल्या क्षीण आवाजानें थांबत थांबत तासन् तास सांगत बसत.

—“ आतां नर्मदातीरीं उन्हाळ्याचा भर आहे. सारी ‘ भेखड ’ तापून तिला चाळीस हात खोलवर सरळ उभ्या चिरा गेल्या आहेत. हेच चिरलेले कडे पुढें पावसाळ्यांत भिजून पाण्यांत धडाधड कोसळून पडतील ! दूरवर पाहिलं तर तापलेल्या हवेच्या लाटा नर्मदेच्या प्रवाहावरून नागमोडी रेषांनीं तरंगत जातांना दिसतात. मोठमोठ्या ‘ पऱ्हया ’ ( होड्या ) भरून

जंगलातले आंबे आतां नर्मदेवरून जात असतील. बाजार नसलेल्या अनेक खेड्यांतल्या घाटांशीं त्या थांबतात.

' पन्हई. आवी—— —— ——आंबा-आव्या. '

म्हणून लहान मुलें खेड्यांत नाचत-पळत जातात. आणि लोक त्यांचे भोंवतीं जमून, घासाघीस करून, थोडे आंबे घेऊन जातात आणि ' पन्हई ' पुढील खेड्याकडे निघते.

——उन्हाळ्यानें नर्मदेचें पात्र कितीतरी आटलें आहे ! दोन्ही बाजूला मैलमैल पसरलेलें रखरखीत, अगदीं बारीक वाळूचें वाळवंट उन्हांत करपून निघत आहे, आणि पात्राच्या मध्यांतून नदीची अरुंद ' धार ' कष्टानें वहात जात आहे. नदींतले मगर आणि मासे पात्रावर ओणवलेल्या उंच झाडांची काळी सांवली पडलेल्या खोल डोहांत जमून दिवस काढीत आहेत ! "

एकादे दिवशीं महादेवरावांना नर्मदातीरच्या वर्षावैभवाची आठवण येई, आणि जणूं काय पावसाळा लागलाच; अशा हुरूपानें ते वेड्यासारखे शेखरचा हात धरून त्याला त्यांचे डोळयासमोर दिसणारीं दृश्यें दाखवीत.

——' पावसाळा आला बघ-शेखर ! फार वर्षे दूरवलेल्या मुलाला भेटावयाला आई जशी हात पसरून उत्सुकतेनें धांवत येते, तसें लाटांचे हात पसरून नर्मदामाई आतां दोन्ही पात्रांवरच्या घाटांना भेटायला धांवत निघाली आहे. हें बघ-आतां तर तीरावरचे सारे घाटहि पाण्याखालीं गेले. कांठावरच्या देवळांतल्या सांबाच्या पिंडीवरून पाण्याच्या सहस्रधारा वाहूं लागल्या आहेत.

श्रावण-झडींत नर्मदेचें पात्र मैलमैल रुंद पसरलें आहे. साऱ्या पन्हयाहि बंद झाल्या आहेत. कोणाला पैलतीराला जायचंच असलं तर कोळी मोठमोठाले रांजण घेऊन पाण्यावर सोडतात. समोर जाणाऱ्या उतारूंनीं त्या रांजणाला घट्ट मिठी मारायची. उतारू आणि रांजण यांना नावेप्रमाणें हातानें लोटीत, पोहत कोळी सफाईनें पैलतीराला जातात.

पाण्याच्या जोरानें तळची जमीन भिजून तीरावरचीं मोठमोठीं झाडें कोलमडून नदींत पडतात आणि तीं प्रचंड धुडें पाणलोटांवर वहात येतात.

तीरावरील कोळीं–कोळणी, आणि दुडदुड धावणारीं लहान पोरेंहि खुशाल बदकांप्रमाणें पाण्यांत पोहत जाऊन त्या झाडांच्या फांद्या वर्षाच्या जळणासाठीं तीरावर ओढून आणतात.

—पावसाळा संपून गढूळ झालेलें पाणी हळुंहळूं स्वच्छ होऊं लागलें आहे. खालीं स्वर्गींच्या अमृतसिंचनानें तृप्त आणि शांत झालेली हिरवीगार धरणी, तीवर कललेला निळ्यानिळ्या आकाशाचा गोल, त्यावरून सहृलत जाणारे कापसासारखे पांढरेशुभ्र ढग, या दृश्यांत नंदनवनाचें सौंदर्य, शांति आणि समाधान अनुभवितां येतें. पुराबरोबर आणलेली मऊ माती मागें टाकून, नदीचें पाणी ओसरतें, आणि घाटांच्या चिरेबंदी पायऱ्या चार हात खोल पांढऱ्या मातीच्या थराखालीं बुजल्या जातात. दुपारीं तेथें जमून गप्पा मारीत, त्या पुन्हां उकरून साफ करणें हा गांवांतल्या मुलांना एक करमणुकीचा खेळ होतो.

नर्मदाकांठचा साऱ्या वर्षातील मोठा उत्सव नवरात्रांत. नऊ दिवस रोज निरनिराळ्या आळींत साऱ्या खेड्यांतल्या बायका जमतात, आणि नऊ रात्रींपर्यंत स्त्रीराज्य चालतें. एखाद्या लहान मुलाला कृष्णासारखें मध्यें बसवून, भोंवतालीं फेर धरून त्या साऱ्या ‘ गरबे ’ [ रासगीतें ] गात आहेत. ‘ नर्मदामातेचे ‘ धोळ ’ [ स्तुतिगीतें ] वृंदावनच्या कृष्णकन्हय्याच्या, नरसिंहमेहता, दयाराम इत्यादि कवीनीं गाईलेल्या रासलीला, हीं सारीं गाणीं रात्रीं बारा वाजेपर्यंत चालतात. खेड्यांतील पटेलीणबाई मोठ्या मानानें रासाची पहिली ओळ छेडते; नंतर साऱ्या स्त्रिया वांकलेल्या उजव्या पावलाचा अन् टाळीचा ठेका देऊन, तीच ओळ समुदायानें म्हणतात. कधीं दिव्यांचा तर कधीं भांड्यांचा रास होतो. लहान चकचकीत भांडी तालावर वरखालीं झेलीत त्या गाणीं म्हणतात. शेवटच्या दिवशीं नर्मदामातेची पालखी निघते आणि पंचक्रोशीतल्या साऱ्या खेडुतांची, भाविकांची गर्दी जमते.

—‘ आज कोजागिरी पौर्णिमा. सारा नर्मदाप्रवाह पाण्याचा नसून दुधाचा आहे असें या शुभ्र चांदण्यांत वाटूं लागतें. सोमेश्वर–कुबेरेश्वराच्या

देवळांत मोठमोठे मंत्रजागर होतात. पन्नास मैलावरचे जटा-घन-पाठी पढीक ब्राह्मण तेथें जमतात. या बघ, प्रचंड सभामंडपांत ब्राह्मणांच्या दोन रांगा एकमेकांसमोर बसल्या आहेत. सर्वांत वयोवृद्ध ब्राह्मण हलत्या मानेनें व कांपऱ्या सुरानें पहिल्या सूक्ताला आरंभ करतो. एकाचें म्हणणें संपण्या-आधींच समोरच्या रांगेतील ब्राह्मण वीरासन घालून, एक हात पुढें करून त्याच्या वरच्या पट्टींत पुढील मंत्र म्हणूं लागतो. ऋक्-यजु-साम-अथर्व या चारी वेदांच्या ब्राह्मणांनीं वेदपुरुषाला निदान नर्मदाकांठीं तरी जिवंत ठेवलें आहे.

बाहेर उघड्या जाळावर दुधाचीं मोठमोठीं तपेलीं आटत आहेत. भांड्यांत बोट बुचकळून त्याचा टिळा लावावा इतकें घट्ट आणि कसदार दूध आटून केशराशिवायच पिवळेंजर्द होतें. दुग्धपानाच्या मधल्या विश्रांतीनंतर सामगायन होतें. उजव्या हाताचीं बोटें गोमुखासारखी करून, अगदीं तुटेपर्यंत उंच स्वर नेऊन एखादा सामवेदी सामगायन करतो. सर्व गायन-शास्त्राच्या उगमस्थानाची हजारों वर्षांपूर्वीची आर्य गायनकला त्या वेळीं मूर्तिमंत अवतरते.

मंत्रजागर झाल्यावर नर्मदामाईची पूजा आणि आरती होते. तीरावरच्या स्त्रिया द्रोणांत तुपाचे दिवे लावून पाण्यावर सोडून देतात. वर नीलगगनांत चमकणारें आकाशगंगेचें पात्र हें दृश्य पाहून हें नर्मदेचें प्रतिबिंब कीं तिचा अंशावतार ? असा भ्रम वाटतो.

### शरद्-हेमंत गेले; वसंत आला—

होळीपौर्णिमेच्या आधींच्या शुक्लपक्षांत सगळीकडे मुलांच्या हातांत छोट्या छोट्या टिमक्या वाजूं लागतात. नवरात्रांत रात्रीं 'स्त्रीराज्य' होऊन पुरुषांना घरीं बसावें लागे, त्या उलट यावेळीं ती पाळी स्त्रियांवर येते.

महाराष्ट्रांत गांवशिवेच्या माळावर तमाशाचीं पालें ठोकलीं जातात, त्याप्रमाणें तिकडे 'भवाई' चे तमासगीर खेड्यांत वाजतगाजत येतात. पाटलाच्या अंगणांत प्रेक्षकांसाठीं चारी बाजूंनीं खाटा टाकल्या जातात; हेंच खेड्यांतलें नाटकगृह.

रंगपंचमीला गांवाचा रंग होतो. घरें–माणसें रंगानें न्हाऊन निघतात. म्हाताऱ्यांच्या अड्ड्यांत मुलामुलींच्या लग्नाची चर्चा होऊन नव्या ‘ सगाया ’ ( लग्नाचे करार ) आणि मागें सगाई होऊन आतां कर्तेसवर्ते झालेल्या मुलांचीं लग्नें, कर्कश ढोलताशांच्या कडकडाटांत साजरीं होतात. नर्मदातीरच्या विस्तीर्ण घाटांवर गांवजेवणाच्या पंक्ति उठतात. एकदां वाढण्यास सुरुवात केली कीं, पात्रांच्यामध्यें, मातींत पडली तरीं न तुटतां साऱ्यांच्या पात्रांतून तुपाची धार पडत जाते. ‘ नर्मदेऽहर–नर्मदेऽहर ’ अशा जयघोषांत ‘ उपर घी नो कंसार ’ ( तूप ओतलेला शिरा ) याची आवडती मेजवानी होते. पुन्हां उन्हाळ्याचा भर येतो, आणि असें हें साधें जीवनचक्र वर्षानुवर्षं पुन्हां त्यांच त्याच चाकोरींतून फिरूं लागतें.

सर्वत्र शांतता, समाधान, आणि जीवनाचा ठराविक कार्यक्रम. अंधाऱ्या खोलींतल्या पाळण्यातील नव्या जीवाचीं, आणि तीरावर भडकलेल्या चितेभोंवतालच्या आप्तांचीं एवढींच आक्रंदनें नर्मदामाईला ऐकूं यावयाचीं.

\+ + +

प्रत्येक दिवसाबरोबर महादेवरावांचा दमा वाढूं लागला होता. शेवटीं शेखरची मॅट्रिकची परीक्षा आटोपली. ते म्हणाले, ‘ चल लवकर, बाळ शेखर, या म्हाताऱ्याला एकदां नर्मदातीरीं पोहोंचवून दे. तुझ्या मांडीवर शेवटची मान टाकीन म्हणून नर्मदामाईला मी वचन दिलें आहे. मुरलीसंगमावर तुझ्या आईच्या अस्थी ज्या जागीं मी टाकल्या त्याच जागीं माझ्याहि अस्थी तूं टाक. आतां या देहाचा मला भरंवसा वाटत नाहीं. इतके दिवस मनानें आठवून तुला वर्णन करून सांगितलेली, या बकाल जगापासून वेगळी शुद्ध शोभा मी एकदां डोळे भरून पाहिली म्हणजे माझ्या जिवाची तळमळ शांत होईल ! ’

पण महादेवरावांना हें समाधान दैवानें मिळूं दिलें नाहीं. त्या रात्रींच त्यांचा दमा अनिवार झाला व शेखरच्या मांडीवर डोकें ठेवून त्यांनीं मोठ्या

कष्टानें प्राण सोडला. त्यांच्या ओठांच्या मूक हालचालीनें मात्र अमूर्त शब्द उमटत होते.

नर्मदे ऽ हर—नर्मदे ऽ हर !

* * *

बारा वर्षांपूर्वी सोडलेल्या त्या स्टेशनावर शेखर अगदीं विषण्ण चित्तानें उतरला. महादेवरावांचें बोट धरून मोठ्या कष्टानें तो त्या उंच डब्यांत चढला होता, आणि आतां मात्र महादेवरावांचे अवशेष त्याच्या ट्रंकेंतल्या डब्यांत त्याच्याबरोबर खालीं उतरत होते !

एक मजूर करून तो आपल्या जन्मस्थानाकडे निघाला. अगदीं ओळखूं येणार नाहीं इतकें त्याचें जुनें जग बदललें होतें. गांव येण्यापूर्वींच लांबून कापूसगठ्ठे दाबण्याच्या गिरणीचें काळकुट्ट धूर सोडणारें धुराडें दिसत होतें.

खेड्याच्या शिवेशींच ' नर्मदा प्रसन्न हॉटेल ' अशा वेड्यावांकड्या कोळशानें काढलेल्या अक्षरांची पाटी एका झोपडीवर लटकत होती; आणि आंतून कपबशांचा खळखळाट ऐकूं येत होता.

शिवेच्या जरा बाहेर एका गांवठी दारूच्या गुत्त्यांतली, भोंवती तांबडे पट्टे ओढलेलीं लांकडी पिपें आंतून डोकावत होती. दाराबाहेरच शिळीं भजीं आणि अंडीं एका टीनच्या पत्र्यावर घेऊन एक गलिच्छ मनुष्य विकत बसला होता. त्याच्या शेजारींच चार-पांच कोळी झिंगून झोकांड्या खात एकमेकांच्या खांद्याचा आधार घेत बरळत होते.

—' शिव ! शिव ! हें तीर्थस्नान; माझें पवित्र जन्मस्थान पण या बारा वर्षांत काय दशा झाली ही त्याची ! एका अर्थी झालं हें बरंच झालं म्हणायचं. बाबांनीं तरी निदान पाहिली नाहीं ही दुर्दशा. कल्पनेनें बारा वर्षांपूर्वींच्या त्या शांत पवित्र नर्मदातीराचें दर्शन घेत ते इहलोक सोडून गेले. इकडे येण्यासाठीं त्यांचा जीव तळमळत होता; पण इकडे येऊन त्यांनीं आतां हें बदललेलं स्थान पाहिलं असतं तर शांतिसमाधानाऐवजीं, निराशा हीच

त्याच्या वांट्याला आली असती–बारा वर्षं अपेक्षेचं तप केलं तें सारं विफल झाल्यानें मृत्यूनंतरहि त्यांना शांति मिळाली नसती.

' क्यां जावूं से ? ( कुठं जायचें ) कोळ्यानें प्रश्न केला. शेखरनें त्यांचे गोर ( उपाध्ये ) शिवशंकर भाई यांचं नांव सांगितलें.

' इ तो क्यारना देव थई गया ' (ते तर केव्हांच वारले ). शेखरनें खचत्या हृदयानें आपल्या बाळपणच्या ओळखीच्या चार पांच मांगसांचीं नांवें विचारलीं; पण ते सारेजण तें खेडें टाकून कुठेंतरी दूरदेशीं गेले होते.

शेवटीं विषण्णतेनें गांव व देवळें मागें टाकून कुबेरेश्वराशेजारच्या आपल्या जन्मस्थानाच्या टेकडीचें दर्शन घेण्यासाठीं शेखर तेथें गेला.

—त्या झोपडीच्या भिंती पडून, मातीच्या कच्या विटांचा खच तेथें पडला होता. एक बाजूचें छप्पर पूर्णपणें कोसळून पडलें होतें आणि पलीकडच्या कोपऱ्यांत एक कुत्री तिचीं थरथरतीं आंधळीं पिलें अंगाशीं घेऊन पडल्यापडल्याच गुरगुरत होती. ती झोंपडी पाहून शेखरचे डोळे भरून आले आणि कोळ्याच्या अंगावर एक पावली टाकून त्यानें खुणेनेंच त्याला जायला सांगितलें.

तो उभा होता त्या भिंतीजवळच्या खाटेवर त्याची आई निजत असे. समोरच्या भिंतीजवळील चूल, आणि त्यांना जोडलेल्या दोन मातीच्या शेगड्या यावर त्यांचा स्वयंपाक होई. कुत्र्यांनीं धोंडे उकरून टाकलेली ती जळकी फुटकी चूल अजूनहि तेथेंच पडली होती. भिंतीच्या मध्यभागीं मोठ्या कोनाड्यांत त्यांचें छोटेसें शिसवी कोरींव देवघर असे. आणि त्यांत त्यांचा चंद्रशेखर बाण अंधारांतहि चमकत असे. वडिलांची ती मूल्यवान् ठेव आजहि त्यानें आपल्याबरोबर ट्रंकेंतून आणली होती. देवघरासमोर एक तांबडी घोंगडी टाकून, तोंडावरून दुसऱ्या घोंगडीचें आच्छादन घेऊन, पद्मासन घालून तासन् तास त्याचे वडील पुतळ्यासारखे समाधि लावून बसत......त्याच्या त्या साऱ्या गतस्मृति जागृत झाल्या.

—— आई!——बाबा! म्हणून हुंदका देऊन त्या पवित्र मातींत पडून तोंड झांकून शेखर लहान मुलासारखा रडूं लागला.

...संध्याकाळपर्यंत तो तसाच पडला होता. कुबेरेश्वराचा नवखा पुजारी देवळाकडे जातांना तिकडे डोकावून गेला.

' इशे कोई पीधेल. ' ( असेल कोणी दारुड्या ). अशा शब्दांनीं घाटावर जाणाऱ्या बायकांनीं त्याची संभावना केली. अन्नपाण्याशिवाय संध्याकाळपर्यंत तो तसाच धुळींत पडून होता. परंतु आपण आईच्या मऊ मांडीवरच डोकें ठेवून पडलों आहोंत असा त्याला भास होत होता.

संध्याकाळच्या सांवल्या कलल्या झाल्या.

त्याच्या डोळ्यांतील आसवेंहि आटून गेलीं आणि लाल सुजल्या डोळ्यांनिशी तो उठून बसला.

एकाद्या निराळ्याच भकास जगांत चुकून आल्यासारखें त्याला वाटत होतें. अजगर आपल्या फांसळ्यांनीं एकाद्या शेळीला आवळून चेंगरून टाकतो त्याप्रमाणें एकलेपणाच्या जाणिवेनें त्याचें हृदय चेंगरलें जात होतें.

तीन दिवसांचा रेल्वेचा हालांचा प्रवास, आणि सारा दिवसाचा उपास या योगानें त्याच्या डोळ्यांपुढें हिरवे पिवळे ठिपके दिसूं लागले होते. उठून उभा राहिल्याबरोबर भोंवतालची सारी सृष्टि आपल्याभोंवतीं गरगर फिरत आहे असें त्याला वाटलें. ट्रंक उघडून त्यांतले एक पांढरें गांठोडें काढून त्यानें त्याला नमस्कार केला व तें हातांत घेऊन तो मुरलीसंगमाकडे निघाला.

भर उन्हाळ्यांत रखरखतीं शेतें दिवसभर नांगरून आपले बैल घेऊन खेडूत खेड्यांकडे निघाले होते. मागून त्यांच्या बायका वाळक्या फाट्यांच्या मोळ्या डोक्यावर एक हातानें सांवरीत, दुसऱ्या हातानें कडेवरील मुलाला कवळीत, मोठ्यानें हंसत, बोलत चालल्या होत्या. वाटेंतले नर्मदेला मिळणारे छोटे ओहळ या वेळीं आटून गेल्यानें त्यांचीं पात्रें म्हणजे मऊ वाळूचे गालिचेच झाले होते. आईबापांच्या प्रेमळ नजरेखालीं कितीतरी वेळां तो

याच वाळूंत लोळला, खेळला होता. तिकडे शेखरनें एक नजर टाकली आणि कष्टानें मान वळवून तो तीराच्या वाटेनें चालला.

मुरलीसंगमाजवळचें नर्मदेचें पात्रहि बरेंच आटलेलें होतें. त्या जवळील डोहाजवळ तो पोहोंचला. मावळत्या सूर्याकिरणांत सारें नर्मदेचें पात्र सोन्याच्या पत्र्याप्रमाणें लखलखत होतें, फक्त तीरावरील झाडें ओणवलेल्या त्या डोहावरच अंधुकपणा पसरला होता.

तीरावरून वांकून वडिलांच्या अस्थींचें गांठोडें टाकण्यासाठीं त्यानें खालीं पाहिलें. डोहाचें पाणी एखाद्या निळसर बिलोरी आरशाप्रमाणें त्याचें प्रतिबिंब दाखवीत होतें. एकाएकीं त्याच्या तोंडून उद्गार आला.

' आई !—बाबा ! '

पाण्यावरील त्याच्या प्रतिबिंबाशेजारींच एकीकडे आईची, आणि दुसरीकडे वडिलांची अशा दोन शांत गंभीर मूर्ति त्याला दिसूं लागल्या. त्यांच्या मुद्रेवर आनंद आणि समाधानाचें हास्य हेलावत होतें.

शेखरचें सारें अंग थरारलें. एकदम उडी टाकून त्या मूर्तीजवळ जावें असा मोह त्याला झाला.

डोहांतल्या दोन्हीं आकृतींनीं हात उचलून त्याला थांबण्याची खूण केली...

मनाचा गोंधळ उडून शेखरच्या हातांतलें गांठोडें खालीं पडलें, आणि त्या मूर्तींच्या जागेपासून रुंदावत पसरणारीं पाण्याचीं वर्तुळें एकमेकांना लोटीत, पुसट होत तीरापर्यंत पोहोंचलीं. पाणी पुन्हां निश्चल झालें, तेव्हां त्या जागीं फक्त शेखरचेंच प्रतिबिंब दिसत होतें.

अगदीं अंधार होईपर्यंत शेखर त्या जागीं उदासपणें बसला होता.

जवळच्या छोट्या देवळांतून एका संन्याशाचा स्वाध्याय अस्फुटपणें त्याच्या कानावर येऊं लागला-त्यांतल्या एका श्लोकानें त्याच्या मनांतल्या प्रश्नाला उत्तर दिलें.

" नाभिनंदेत मरणं, नाभिनंदेत जीवनम् ।
कालमेव प्रतीक्षेत निर्देशं भृतको यथा ॥* "

शेखरनें देवळांत जाऊन संन्याशाच्या पायांवर आदरानें—कृतज्ञतेनें डोकें टेकलें.

—त्या मंदिरांत आतां शेखरनें आणलेल्या स्वयंभू, दिव्य चंद्रशेखर बाणाची प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली आहे. त्याच्या प्रयत्नाने आणि कार्यानें स्वतंत्रवृत्ति, साक्षरता, आणि सनातन धार्मिकता यांचा सुंदर संगम त्या खेड्याच्या पंचक्रोशींत दिसूं लागला आहे.

सकाळ-संध्याकाळ त्या देवळांत शंख-घंटा वाजतात.

घरीं परतणाऱ्या गोखुरांच्या धुळींत देवळाबाहेर येणारा धूपाचा सुगंधी धूर मिसळून जातो.

आरती संपल्यावर सारे जयघोष करतात—

'नर्मदेऽहर'

त्याच वेळीं शेजारच्या डोहांतून दोन आवाज मिसळून एक ध्वनि येतो-'नर्मदेऽहर'

देवळांतल्या लोकांना तो आपल्या घोषाचा प्रतिध्वनीच वाटतो.

पण त्या ध्वनीचें खरें रहस्य नर्मदामाईला ठाऊक आहे—

—आणि चंद्रशेखरला—

[१९३८]

* मरणाची इच्छा करूं नये, आणि जीवनाचा लोभहि धरूं नये. नोकर धन्याच्या आज्ञेची वाट पहातो त्याप्रमाणें योग्य कालाची मात्र प्रतीक्षा करावी.

( १ )

साखरवाडी, ग्रामोद्धार-शिबिर

श्री. प्रकाशराव यांस सा. न. वि. वि.

मला इकडे येऊन चार दिवस झाले; अजून मला नवल वाटतें कीं, तुम्ही मला केलेला प्रश्न तुम्हांला करवला तरी कसा? माझें सर्व लक्ष ग्रामोद्धार आणि साक्षरताप्रसार या कार्याकडेच आहे. नकाराचा राग मानूं नये. तुमच्याबद्दल मला तिरस्कार वाटतो असें नव्हे, परंतु एवढ्यांतच प्रेम आणि लग्नाच्या पाशांत अडकून पडणें मला योग्य वाटत नाहीं. आपण दोघे उत्साहानें कार्य करीत असतां तुम्ही टाकलेला हा भलताच अवघड प्रश्न, आणि त्याला मी दिलेला नकार यानंतर मला तुमच्याबरोबर राहून कार्य करणें योग्य वाटलें नाहीं. तेवढ्यांत साखरवाडीच्या ग्रामोद्धार शिबिरासाठीं स्वयं-सेविका पाहिजेत हें निवेदन वाचून मी कोणालाहि न कळवितां इकडे आलें आहें. आमचें कार्य शिस्तीप्रमाणें सुरू आहे.

प्रेमाबिमाची भानगड न करतांहि दोन स्त्रीपुरुष दोन पुरुषांच्या मैत्रीसारखे साध्या व्यवहारी मैत्रीचे संबंध ठेवूं शकतात हेंच मला सिद्ध करा-वयाचें आहे. तुम्ही या बाबतींत दगा दिल्यामुळेंच माझा तुमच्यावर राग आहे. तिकडील हालहवाल, कार्य वगैरेबद्दल पूर्वीच्या मोकळेपणानें पत्रें पाठवून मैत्री कायम ठेवावी.

आपली मित्र [ मैत्रीण नव्हे],

विमल.

( २ )

हरिजन–वसाहत, शिबिर, पुणें

कु. विमल ईस, सा. न. वि. वि.

तुझें पत्र पोंचलें. साखरवाडींतील ग्रामोद्धाराच्या कार्यांत तुला यश चिंतीत आहे. येथील हरिजन व मजुरांच्या वस्तींतील साक्षरता–प्रसाराचें माझेंही कार्य चालू असून हळूं हळूं, संकोचानें कां होईना पण थोडे थोडे लोक आतां फळ्यासमोर येऊन बसूं लागले आहेत. फळ्यावरील शब्दांबरोबरच शहरांत नेहमीं भिंतीवरून ओरडून उठणाऱ्या सिनेमाच्या रंगीबेरंगी मोठ-मोठ्या जाहिरातींचा मी उपयोग करून घेत आहे. मोठमोठ्या अक्षरांच्या जुन्या जाहिराती या कार्यासाठीं देण्याचें कांहीं थिएटरमालकांनीं कबूल केलें आहे.

या जाहिरातींकडे लक्ष्य जाण्याचें कारण म्हणजे तुला कल्पनाहि नसेल इतके हे अशिक्षित मजूर एका बाबतींत पुढारलेले आहेत हें. ती बाबत म्हणजे सिनेमाची. सुशिक्षित लोक पहात नसतील इतके देशी बोलपट मजूर, कामकरी आणि मोलानें धुणीं भांडीं करणाऱ्या त्यांच्या बायकाही पाहात असतील असें मला पूर्वीं कोणी सांगितलें असतें तर त्यावर माझा विश्वास बसला नसता. आतां मात्र, एक वेळचें जेवण चुकवून, त्या खर्चांत सिनेमाचा एक खेळ पाहणारे लोक मी प्रत्यक्ष पाहात आहे. त्यांच्या परिचयाच्या जाहि-राती आणि हँडबिलांवरून मी त्यांना अक्षरओळख करून देत आहे.

मुख्य अडचण म्हणजे स्त्रियांतील साक्षरताप्रसाराची. आपण दोघे कार्य करीत असतां या बाबतींत बरीच प्रगति केली होती. पण एका साध्या प्रश्नामुळें माझ्यावर रागावून तूं साखरवाडीस निघून गेल्यामुळें या बाजूचो फार हानि झाली आहे. तेवढ्यांत समाधान म्हणजे स्त्रियांच्या साक्षरताप्रसारा-बद्दल आस्था असलेली एक श्रीमंत, सुशिक्षित कार्यकर्ती उषा धनवंते यांचा व माझा नुकताच परिचय झाला असून आम्ही परस्पर विचारविनिमय

करून कार्याची रूपरेषा ठरवीत आहोंत, पण कांहीं असो अजून पूर्वींइतका उत्साह वाटत नाहीं. पुढें काय होईल न कळे ! तुझा,

प्रकाश

( ३ )

ग्रामोद्धार शिबिर, साखरवाडी.

रा. रा. प्रकाशराव यांस सा. न. वि. वि. आपलें पत्र पावलें. स्त्रीविभागांतील कार्यांत माझी वाण कु. उषाबाई धनवंते यांनीं भरून काढण्यास सुरवात केली आहे हें वाचलें. आपल्यासारखे 'गुरु' मिळाल्यावर तरबेज व्हायला त्यांना फारसा वेळ लागणार नाहीं. आपण मागें टाकलेल्या प्रश्नाच्या बाबतींतहि माझ्यापेक्षां कदाचित् त्याच तुम्हाला अधिक अनुकूल उत्तर देऊं शकतील. त्यांना माझा नमस्कार कळवावा, व त्यांच्याबद्दल कांहीं अधिक माहिती पुढील पत्रांत कळवावी, कारण कदाचित् त्यांची आणि माझी पूर्वींची ओळखहि निघू शकेल.

शहरांतील अडचणीपेक्षां खेड्यांत अनेकपट आणि अनेक प्रकारच्या अडचणी असतात हें मला हळूं हळूं अनुभवानें कळून येऊं लागलें आहे. त्यामुळें तुमच्याप्रमाणें माझ्या कार्याची कांहीं झटपट फलश्रुति तुम्हांला कळवितां येत नाहीं. खालीं दिलेल्या यादीप्रमाणें साधनसामुग्री मिळाल्यास ताबडतोब पाठवावी.

विमल

( ४ )

हरिजन–वसाहत शिबिर, पुणें.

कु. विमलाबाई यांस सा. न. वि. वि. पत्रांतील यादीप्रमाणें मेणकापडाचा एक फळा, खडूची पेटी आणि साक्षरताप्रसार वाचनमालेच्या पुस्तकांचे पांच गट यासोबत पाठवीत आहे.

कु. उषाबाईबद्दल मात्र लिहिलेल्या मर्मभेदक विधानामुळें मनाला फार वाईट वाटलें. आपल्याकडे कोणीहि अविवाहित स्त्रीपुरुष एकत्र बोलले,

हिंडूं फिरूं लागले म्हणजे त्यांचा प्रेमसंबंध असलाच पाहिजे अशी ठाम समजूत होऊन बसली आहे. तुझ्यासारख्या सुशिक्षितांचा एक प्रकार, तर इथल्या अशिक्षितांचा दुसरा प्रकार. काल मी माझ्या मजुरांच्या वर्गांत मुळाक्षरांचा तिसरा गट शिकवीत होतों. तितक्यांत शेजारच्या बायकांच्या वर्गांतील एक बाई तणतणतच तिथें आली अन् जी हात पसरून माझ्याशीं भर वर्गांत भांडायला लागली कीं, अगदीं विचारूं नकोस—" ए लिवणाऱ्या बाबा! तुझ्या बायकुला नीट सांभाळ, न्हाइ तर येक दिवशीं अशी झिंज्या वढून तुडवीन, हां ऽ! कंदी माज्या दादल्याचं बी फट् म्हनून घेतलं न्हाइ मी, अन् ही तुझी टिचभर आवा—ही झिप्री, मला म्हंगतें, येवढं कळत नाहीं तुला, डोस्क हाय कीं मडकं हाय! आतां ऽ काय म्हनूं तुला सटवे ऽऽऽऽ... "!

माझे मजूर विद्यार्थी तर ही गंमत पाहून मोठमोठ्यानें हांसूंच लागले. मी अगदीं गोरामोरा झालों. तिच्या शिव्यांनीं नव्हे तर तिनें उषेचा आणि माझा जो संबंध जोडला त्यामुळें. पलीकडे पाहिलें तर बायकांचा क्लासहि फिदीफिदी हंसत परत चालला होता. उषेच्या खोलीकडे गेलों तर ती कडी लावून रडत पडली होती.

मागून मला कळलें कीं मघाच्या त्या दालगज बाईनें तिला भर वर्गांत धाक दाखविला कीं ' दम धर जरा तुज्या दादल्यालाच सांगतें मला काय शिया देत्यीस त्यें. ' बिचाऱ्या उषेनें सरळ सांगितलें कीं ते प्रकाशराव माझें कोणी नाहींत. तर त्या साऱ्या बायका म्हणे एकमेकींकडे डोळे मिचकावून, हंसायला लागल्या. ' क्येला नसला अजून तर ध्ये करून दादला ' म्हणून कोणीतरी चावट बाई मागून म्हणाली. ' भली श्योभल जोडी—म्हसोबाला न्हाई बायकुं अन् सटवाईला न्हाई नवरा ' त्यांचा विनोद भलत्या थराला जातांना पाहून उषा रागावून क्लास सोडून देऊन निघून आली.

ही आठवण मनांत असतांना त्यावर उषेबद्दलचें तुझें खोंचून लिहिणें. कोणाला नाहीं येणार राग?

तुझा प्रकाश.

( ५ )

ग्रामोद्धारशिबिर, साखरवाडी.

रा. रा. प्रकाशराव यांस सा. न. वि. वि.

तुमचें पत्र वाचून फार मौज वाटली. एकूण तुम्ही कमाल केलीत, माझ्या बद्दल प्रेमाची इतकी बडबड करून, मी दृष्टीआड झाल्याबरोबर त्या श्रीमंत नी हौशी उषेबरोबर संधान जमवायच्या बेतांत तुम्ही आहांत.

या उषा प्रकरणाचा तुमच्या तोंडूनच खुलासा झाला म्हणून बरें झालें. आतां तुमचें माझ्याबद्दल वाटणारें प्रेम नाहींसें झालें असेल, हें उघडच आहे. हा सारा संबंध संपला म्हणून आतां निर्धास्तपणें सांगायला हरकत नाहीं कीं, मी साखरवाडीस निघून आल्यापासून कितीतरी वेळां माझ्या मनांत तुमच्या-बद्दल विचार येत. कधीं कधीं अगदीं एकटें वाटे. तुमच्या मागणीला नकार दिला याचा पश्चात्ताप होई; पण आतां तुमचें पत्र वाचून 'झालें हें बरेंच-झालें' असें वाटतें. सारे पाश तुटल्याशिवाय खरें कार्य होत नसतें हेंच सत्य आहे. आमच्या होऊं घातलेल्या उषावहिनींना माझा नमस्कार कळवावा.

विमल.

( ६ )

हरिजन-कल्याण शिबिर, पुणें.

कु. विमल हीस. इकडच्या लोकांनीं कांहीं म्हटलें तरी तूंहि त्यांना साथ देशील अशी मला कल्पनाच नव्हती. मी उल्लेख केलेल्या उषेबद्दल तुझा बराच गैरसमज झालेला दिसतो. ती श्रीमंत आणि सुशिक्षित आहे आणि तिचें उषा हें काव्यमय नांव आहे एवढ्यावरूनच तूं साऱ्या कल्पना रचलेल्या दिसतात. रूपाकडे न पहातां बारशाच्या दिवशींच मुलामुलींचीं नांवें ठेवण्याची आपल्याकडे पद्धत आहे म्हणूनच उषा हें नांव तिच्या आई-बापांनीं तिला दिलें असावें. आज जर तिला नांव ठेवण्याची वेळ आली तर उषेऐवजीं-'संध्या,' 'रजनी,' 'श्यामा,' अथवा 'कालिंदी' यांपैकीं कोणतें

तरी एक नांव तिच्या काळ्या रंगाला अधिक शोभेल. केवळ तिचा रंग काळा आहे एवढ्यानेंच संपलें नाहीं. कोणीतरी म्हटल्याप्रमाणें विधात्याच्या कांहीं चुकीनें तिच्या साऱ्या अवयवांची थेट उलटापालट झालीशी वाटते. तांबूस चेहरा आणि काळेभोर केस असण्या ऐवजीं तिचा चेहरा मात्र काळा भोर असून केस तांबूस रंगाचे आहेत. चाफेकळीसारखें सरळ नाक आणि इंद्रधनुष्यासारख्या वक्र भिवया असण्याऐवजीं तिच्या भिवयाच चाफेकळी-सारख्या सरळ आणि जाड असून, नाक मात्र धनुष्याकृति ऊर्फ वांकडें आहे ! काव्यात्मक सौंदर्य म्हणजे तोंडल्यासारखे ओठ, सफरचंदासारखे गाल, शिंपल्यासारखे कान आणि शंखासारखा गळा. हे प्रकार तिच्या ठिकाणीं आहेत. परंतु त्यांच्या स्थानांचीहि अदलाबदल झाल्यासारखी दिसते. म्हणजे गळा शंखासारखा असण्याऐवजीं तिचा आवाज मात्र शंखासारखा आहे ! कान शिंपल्यासारखे असण्याऐजीं सुपल्यासारखे आहेत. ओठांत मात्र अगदीं थोडा फरक आहे—म्हणजे तें ‘ तोंडल्यासारखे ’ असण्याऐवजीं केवळ ‘ तोडल्यासारखे ’—म्हणजे वाळकट आणि तुटल्यावजा दिसतात. फक्त एका अनुस्वाराचा फरक ! भरींव छाती आणि कृश कटि यांनीं आपल्या स्थानाची नेमकी अदलाबदल केली आहे. एकूण गोळाबेरीज एक झाली म्हणजे झालें !!

सांगायचं म्हणजे काय ? एवंगुणविशिष्ट अशा उषाबाईचा आणि माझा संबंध ठरवून टाकून तूं मला शब्दशः काळेपाण्याची शिक्षा दिलीस, याबद्दल मात्र राग आला. प्रत्युत्तर न मिळालेल्या कां होईना पण तुझ्या-बद्दलच्या प्रेमाच्या अमृताचा घोट घेतल्यावर या काडेचिराइताच्या काढ्याकडे मन जाणे शक्य आहे कां ? कांचनगंगा डोळ्यापुढें असतां ‘ काळा खंड ’ धुंडण्याचा कोण प्रयास करील ?

आनंदाची गोष्ट एवढीच कीं, आपलें प्रेमप्रकरण संपलें असें समजून तरी तूं आपल्या मनोभावनांची कबुली दिलीस ती वाचून मला फार समा-धान वाटलें. हातचा धरून बेरीज करतात त्याप्रमाणें मागील प्रेमांत याचा समावेश करून बेरीज पुढें ओढ म्हणजे झालें. आणि हें पहा, त्या उषेबद्दल

भलत्या कल्पना धरून गैरसमज करून घेऊं नकोस. असल्या भयंकर उपेऱ्या दर्शनानें वेडा होण्याइतका अरुण ( ऊर्फ पांगळा ) मी बिलकूल नाहीं हें लक्षांत ठेव.

तुझ्या कार्याबद्दल मात्र एक सावधगिरीचा कळकळीचा इशारा देऊन ठेवतों.

"खेड्याकडे चला" ही आरोळी ठीक आहे. परंतु त्यासाठीं लोकांपुढें खेड्यांतील खरी परिस्थिति ठेवावयास हवी. पण हे प्रचारक लोक एकदां रंगले म्हणजे ही खेडीं नव्हेत तर नंदनवनांतल्या वसाहतीच आहेत अशीं वर्णनें करूं लागतात. परंतु खरी परिस्थिति फार निराळी असते. खेड्यांतील गांवगुंडी, तटातटांचा मत्सर, आळशीपणा, खुनशीपणा वगैरे मनुष्यस्वभावांतले दोष शहराइतकेंच खेड्यांतहि आढळतात हें स्पष्ट कां सांगूं नये? माझें म्हणणें एवढेंच कीं, खेड्यांतहि चांगल्याबरोबर वाईट गोष्टीहि असतात हें नीट लक्ष्यांत ठेविलें पाहिजे, नाहींतर खेड्यांबद्दल भलत्या अद्‌भुतरम्य कल्पना डोक्यांत घेऊन नवशिके कार्यकर्ते ग्रामोद्धार करावयास जातात आणि खेड्यांतील खरी परिस्थिति समजली म्हणजे त्यांचे डोळे एकदम सताड उघडतात. मग ते जी धूम ठोकतात ते पुन्हां खेड्यांच्या वाटेला जात नाहींत.

असो. वारंवार पत्रें पाठवून खुशाली कळवीत रहा. तूं बेपर्वाई दाखविलीस तरी तुझ्यासाठीं माझा जीव तिळतिळ तुटत आहे म्हणून इतकें स्पष्ट लिहावें लागलें.

तुझा प्रकाश

( ७ )

ग्रामोद्धार शिबिर, साखरवाडी.

श्री. प्रकाशराव यांसी सा. न. वि. वि. आपलें उपदेशपर आणि पांडित्यपूर्ण पत्र पावलें. परिस्थिति कशीहि असली तरी त्यांतच राहून आपल्याला कार्य करावयाचें आहे.

तुमचें उपेच्या सौंदर्याचें विडंबन काव्य वाचून मला पहिल्यानें हंसू आलें, पण मागून मात्र सपाटून राग आला. माझा नव्हे—उपेचा नव्हे—तर हा स्त्रीजातीचा अपमान आहे असें मी समजतें. याबद्दल तुम्हांला योग्य शिक्षा झाली पाहिजे. ती योग्य व्यक्तीकडूनच म्हणजे उपेकडूनच व्हावी म्हणून तुमचें पत्र वर चार ओळी लिहून मी सरळ उपाताईकडे रवाना करणार आहे. म्हणजे तरी आपण ज्याच्याबरोबर कार्य करीत आहात त्यानेंच आपल्याबद्दल काय तारे तोडले आहेत हें तरी त्या बापडीला कळून येईल.

याच्या बुडाशीं उषेबद्दल मत्सर आहे असें बिलकूल समजूं नये. तुम्ही अन् ती उषा यांचें लग्न झालें तर मला कांहींहि वाईट वाटणार नाहीं.

यानंतर तुमचें पत्र येईल असें मला वाटत नाहींच. म्हणून आतांच निरोप घेऊन ठेवतें.

विमल

( ८ )

हरिजन-वसाहतशिबिर, पुणें.

कु. विमलाबाईस सा. न. वि. वि. आपलें पत्र पावलें. मित्रत्वाच्या नात्यानें एकमेकांना पाठविलेलीं खासगी पत्रें परभारें दुसरीकडे पाठवून तुम्ही शिष्टाचाराचा भंग केला आहे याबद्दल मात्र मला राग येतो. उपेची थट्टा केल्याबद्दल तुम्ही एवढी आग पाखडली आहे, परंतु मित्रांच्या अड्ड्यांत बसून अशा प्रकारची थोडीबहुत थट्टा कोण करीत नाहीं? तुमच्या स्त्रीमंडळांत बसून ओळखीच्या पुरुषांनाहि कोणाला 'वक्रतुंड,' कोणाला 'कोळशाचा व्यापारी' तर कोणाला 'बजरबट्टू' अशीं नांवें स्वयंसेविकांनीं ठेविलेलीं मी प्रत्यक्ष ऐकलीं आहेत.

उषेबद्दल केलेल्या विनोदाची ही प्रतिक्रिया होऊन जी शिक्षा सोसावी लागेल ती मुकाट्यानें सहन करण्याची मी तयारी करून ठेवीत आहे. कारण या बाबतींत सारवासारव किंवा खुलासा करूनहि कांहीं उपयोग नाहीं हें मला स्पष्ट दिसत आहे.

प्रकाश

ग्रामोद्धार शिबिर, साखरवाडी.

श्री. प्रकाशराव यांस सा. न. वि. वि. मागील पत्रांपेक्षां अगदीं निराळ्या परिस्थितींत आणि मनःस्थितींत मी हें पत्र लिहीत आहे. माझ्या मागील पत्रानंतर तुम्ही मला पुन्हां पत्र लिहाल अशी माझी अपेक्षाच नव्हती. तुमचें पत्र आणि त्यांतील खुलासा वाचून मात्र मला ओशाळल्यागत वाटूं लागलें. मी सहज फेंकून दिलेल्या या काडीमुळें आतां केवढी आणि किती ठिकाणी आग लागेल कोण जाणे.

तुम्हांला वाचून कदाचित् आश्चर्य वाटेल कीं, साखरवाडींतील ग्रामोद्धाराचें कार्य अर्धवटच टाकून मी दोन दिवसांनीं परत येणार आहे. नव्या कार्याच्या उत्साहानें मी येथें आलें, आणि तें अर्धवट टाकून मी दोन दिवसांनीं परत येणार आहे. या परिस्थितीनें मन कसें उदास होतें आणि वाटूं लागतं कीं साक्षरता आणि ग्रामोद्धाराचें कार्य प्रथम वाटलें इतकें सोपें नाहीं.

येथें आल्यावर इकडील इनामदाराच्या वडील मुलानें माझी ओळख करून घेऊन कार्याला सर्व प्रकारची मदत देण्याचें आश्वासन दिलें. व्याख्यानें, प्रभातफेऱ्या, गांवसफाई, साक्षरतेचे वर्ग या साऱ्यांत तो माझ्याबरोबर फिरत असे. काल रात्रीं बायकांचा वर्ग आटपल्यावर संभाषण, चर्चा आणि एक ठिकाणीं झालेलें व्याख्यान आटपून मी शिबिरांतील माझ्या खोलीकडे निघालें. मी नको म्हणत असतांहि कंदिल आणि काठी घेऊन तो माझ्याबरोबर आलाच. गांवची वेस ओलांडून शेतांतून शिबिराच्या वाटेला लागल्यावर कंदिलाची वात जळायला लागून घाण येऊं लागली अन् पटकन् दिवा विझला. अंधारांत, खेकड्यांच्या बिळांत पाय अडकून मी एकदां दोनदां ठेंचाळलें. मला आधार देण्याच्या मिषानें त्यानें माझा हात हातांत धरून ठेवला, तेव्हांच माझ्या मनांत चर्र झालं. इतक्या दिवसाचें आदराचें अनेकवचन टाकून एकदम एकेरीवर

येऊन तो म्हणाला– " कशाला इतकी दगदग करतेस या नांगरगठठ्यां-साठीं ?–अग, हे आहेत तसेच रहायचे जन्मभर–अन् हीं श्रमाचीं कामं का तुझ्यासारख्या नाजूक छबेलीसाठीं आहेत ? वेडी कुठली. हें बघ–माझ्याशीं लग्न कर अन् आरामांत रहा इथेंच. हें सारं गांव माझं. मी इथला राजाच म्हणेनास. कांहींएक कमी पडूं देणार नाहीं तुला. आतां माझी पहिली बायको आहे, पण ती तुला मोलकरीण म्हणून देखील शोभणार नाहीं. तुला पाहिल्यापासून, बस्! अगदीं चैन पडत नाहीं. आतां हो म्हटल्याशिवाय जाऊं देणार नाहीं तुला इथून. "

माझ्या अंगाला अगदीं घाम सुटला. तोंडून शब्द निघेना. माझं शिक्षण–करारीपणा–ग्रामोद्धार–साक्षरताप्रसार–सारे प्रकार कुठल्याकुठें पळाले. मी लटलट कापूं लागलें. तो निर्लज्ज म्हणाला " एऽ ! तुझ्यासारखी शहरची पोर अन् इतकी बावरते ! कां सोंग करतेस उगीच ! अग, खेड्यांतला असलों तरी त्या शहरांतल्या कॉलेजच्या पोरांपेक्षां मी दसपट दमदार अन् रंगेल आहे समजलीस ! "

काठी खालीं टाकून त्यानें मला जवळ ओढण्याचा यत्न केल्यावर मात्र मी किंकाळल्येंच. त्यानें तोंडावर हात ठेवल्यावर मी अश्शी कडकडून चावलें कीं माझें सारें तोंड खारट रक्तानें भरून गेलें. दोन चार मिनिटांतला हा प्रकार. सुदैवानें पलीकडल्या घळींतून कांहीं शेतकरी त्यांच्या शेतावरच्या खोपटाकडे राखणीसाठीं चालले होते ते माझ्या किंकाळ्या ऐकून धांवत आले. " काय झालं–काय झालं–" म्हणून घोळका जमला. " कांहीं नाहीं–या बाईना त्यांच्या छावणींत पोंचवीत होतो–तेवढ्यांत कांहीतरी चावल्यासारखं वाटून त्या ओरडल्या. " म्हणून त्यानें लोकांना वाटेला लावलं. मी मात्र त्यांच्या-बरोबर चालत छावणींत येऊन पोंचलें आणि अंथरुणावर अंग टाकलें.

खेड्यांतल्या गुंडगिरीची कांहीं ऐकीव हकीकत माझ्या कानावर येत असे. पण तिचा प्रत्यक्ष प्रयोग माझ्यावरच झाल्यानें मी अगदीं चरकलें आहे. यामुळेंच मी छावणीचा कार्यक्रम अर्धवट टाकून परत फिरत आहे.

त्या गुंडाच्या स्पर्शाची आठवण झाली म्हणजे अजून माझ्या अंगावर शहारे येतात. यापूर्वीची माझी सारी, गुर्मी बेपर्वाई, स्वच्छंदपणा त्या आठवणीनें नाहींशी होऊन, कोणाचा तरी आश्रय घेऊन निश्चिंत व्हावें असे आतांपर्यंत कधीं न आलेले विचार येऊं लागतात. हा इतका फरक एकाएकीं माझ्या मनांत कसा झाला याचें माझें मलाच कोडें पडतें—पण झाला प्रकार हा आहे खरा.

मागें विचारला होता तोच प्रश्न तुम्ही पुन्हां विचाराल का ? अगदीं सारा अभिमान सोडून मीच होऊन लिहितें.

त्या उपेला पत्र पाठवून बसलें आहे मी. या मूर्खपणानें तिकडे काय गोंधळ उडाला असेल कोण जाणे. तुम्हांला तिचीं भलतीं बोलणीं ऐकावीं लागून काय त्रास होत असेल याची कल्पना येऊन मला अगदीं ओशाळल्यागत होतें.

पूर्वीच्या बेपर्वाईची भरपाई करण्याची संधि मला मिळेल का ?

आपली

**विमल.**

## ( १० )

हरिजन—वसाहत, पुणें.

माझ्या विमलेस अनेक अशीर्वाद. तुझें पत्र वाचून मनांत अनेक विचारांची गर्दी झाली. पहिला अर्थात् स्वार्थाचा. ज्या माझ्या मागील प्रश्नाला तूं बेपर्वाईनें नकार दिला होतास त्यालाच आतां होकार देण्याची तुझी तयारी आहे हें वाचून साहजिकपणेंच आनंद वाटला.

दुसरा विचार दयेचा आणि सहानुभूतीचा.

तुझ्यासारख्या अल्लड, अननुभवी मुली शहरांतल्या एखाद्या व्याख्यानानें हुरळून, ग्रामोद्धारासारख्या प्रचंड कार्याला कांहींएक तयारीशिवाय हात घालतात हें पाहून त्यांची कींव येते. अशा कार्याला किती बाजू आहेत, मार्गांत किती अडचणी आहेत, किती तयारी करावी लागेल याची कल्पनाही

नसतां, सरळ डोळे झांकून या कार्यांत उडी घेणाऱ्यांच्या पदरीं तुझ्याप्रमाणें अपयश येतें. आणि सर्वांत वाईट म्हणजे अशा कार्याबद्दल त्यांच्या मनांत कायमची अढी बसते. ग्रामोद्धाराचा प्रश्न आठपंधरादिवस खेड्यांत छावणी टाकून परत येणाऱ्या पोरापोरींकडून सुटणें अशक्य आहे. खेड्यांचा उद्धार खेड्यांत जाऊन जन्मभर रहाणाऱ्या लोकांकडूनच होईल, इतरांकडून नव्हे. ज्याला कांहीं कार्य करायचं आहे त्याच्या समोरच कार्याचे डोंगर पडलेले दिसतील. कार्य कार्य म्हणून त्याला थेट अनोळखी खेडींच गांठलीं पाहिजेत असें नाहीं. प्रत्येकानें स्वतःच्या भोंवतालचं—पूर्ण माहितीचंच-कार्यक्षेत्र आंखून त्यांत सुधारणेचं कार्य करायचं ठरविलं तरी किती प्रगति होईल. असो.

आमच्या हरिजन आणि मजुरांच्या साक्षरता वर्गाचा समारोप कालच झाला. साऱ्यांनीं शिक्षकांसमोर वृत्तपत्र आणि आपलं पुस्तक, चुकतमाकत कां होईना पण वाचून दाखविलं आणि चार ओळींचं पत्रही लिहून दाखविलं. सांगायचं म्हणजे तूं इकडे आल्यावर शहरांतच तुला जन्मभर पुरून उरेल इतकं कार्य अजून शिल्लक आहे. कार्यच्युत झाल्याबद्दल खंत बाळगण्याचें कारण नाहीं. अनोळखी खेड्यांचा उद्धार करण्याचें कार्य सध्यां आपण आपल्याहून अधिक लायक लोकांकडे सोंपवूं या !

तुला अनुभव आला तो अगदीं कडवट आणि अप्रिय, पण त्यामुळेंच तुझे डोळे उघडून तुला माझ्या प्रेमाची आठवण झाली. ही ठेंच लागली नसती तर आणखी कोणा प्रांतातल्या खेड्यांचा उद्धार करायला तूं परांगदा झाली असतीस कोण जाणे. तेव्हां झाला हा प्रकार बऱ्यासाठींच झाला असें समजण्याइतका आप्पलपोटेपणा माझ्याजवळ आहे. तुझ्या मागील वर्तणुकीबद्दल तूं क्षमा मागून शिक्षा करण्याची परवानगी देऊन ठेवली आहेस. त्यापैकीं क्षमा आतांच पाठवीत आहे. उरलेली गोड शिक्षा किती आणखी कोणत्या प्रकारानें करावयाची ते तूं इकडे आल्यावर समक्षच कळवीन.

उषेच्या पत्राबद्दल काळजी वाटूं देऊं नकोस. त्याचा उलगडा कालच झाला. उषा म्हणजे एक श्रीमंत लहरी मुलगी. तुझ्याप्रमाणेंच हुरळून

समाजकार्य करायचं म्हणून या मार्गाला लागली. पण उत्साह ओसरल्यावर, आणि अशिक्षित बायकांच्या शिव्या खाल्ल्यावर कंटाळून ती आठ दिवसांपूर्वीच महाबळेश्वरला निघून गेली. ती गेल्यावर तूं पाठविलेलें पत्र तिच्या नांवावर आलें. आश्रमांत आलेल्या पोस्टमनला मला थाप मारावी लागली कीं तिचा पत्ता कोणाला ठाऊक नाहीं. प्रेमांत खोटें बोलणें क्षम्य आहे अशी शास्त्राज्ञा आहे. " मालकाचा पत्ता नसल्यानें पाठविणारास परत " असा शेरा पडून तें पत्र तुला काल आज मिळालें असेलही. परवांपर्यंतचे तास मोजीत तुझी वाट पहात आहे.

तुझाच

प्रकाश.

[ १९४० ]

→ समाप्त ←